...र मासिकाची उत्कर्षमाला : पुष्प १२ वें.



# आधुनिक गीता

प्रो० ना. सी. फडके, एम्. ए.

किर्लोस्कर मासिकाची उत्कर्षमाला : पुष्प १२ वें.

# आधुनिक गीता



प्रो. ना. सी. फडके एम्. ए.

१९३५



अ. १२

# आधुनिक गीता

## सूतोऽवाच

भारतीय युद्धाच्या वेळीं श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जी गीता सांगितली तिची थोरवी अपूर्व होय यांत शंका नाहीं. श्रीकृष्णांनीं गीता सांगितली ती अर्जुन मोहवश झाला होता व भ्रमांत पडला होता म्हणून; आणि त्या गीतेचें अध्ययन व मनन सर्वांनीं करावें असें सांगण्यांत येतें तेंही आपण सारेच प्रसंगवशात् भ्रमांत पडतों व किंकर्तव्यमूढ होतों म्हणून. आपल्या प्रत्येकाचें मानवी जीवित हें एखाद्या युद्धासारखेंच आहे. आपल्यापैकीं ज्याला ज्याला म्हणून जगायचें असेल त्याला युद्ध करणें, सतत झगडणें भाग आहे. ब्राह्मण्य अंगिकारल्याखेरीज—म्हणजे विद्याव्यासंगाखेरीज—या आधुनिक काळांत जसें कोणाचें चालणार नाहीं, तद्वतच क्षत्रियाची बेडर वृत्ति आणि प्रहारशक्ति दाखविल्यावांचूनही कोणाचा टिकाव लागणार नाहीं. दया आणि काठिण्य, हिंसा व अहिंसा, क्षमा आणि प्रतिप्रहार अशा उलट-सुलट गुणांचे पवित्रे टाकीत, व डाव करीत जीवितमार्ग आक्रमिल्या-वांचून माणसाला गत्यंतरच नाहीं. ह्या धांदलींत मनाचा खंबीरपणा कायम ठेवला तरच ठीक; नाहींतर बुद्धिभ्रंश व्हायला, आणि गांगरल्यामुळें जन्म फुकट जायला वेळ लागणार नाहीं. रणक्षेत्रावर पूज्य गुरु आणि प्रिय बांधव उभे ठाकलेले पाहून अर्जुन भांबावला, आणि 'या क्षणीं माझें कर्तव्य कोणतें हेंच मला कळत नाहीं!'

असें उद्गारला. आज विसाव्या शतकांत तर सामान्य माणसानें अर्जुनापेक्षां कितीतरी पटीनें अधिक भांबावून जावें अशी परिस्थिति प्राप्त झालेली आहे !

कारण, एकीकडे मनुष्यजातीच्या ज्ञानाची खूप प्रगति झाली आहे हें जसें खरें, तसेंच त्या ज्ञानामुळें माणसाची श्रद्धा बळकट होण्याऐवजीं डळमळत चालली आहे हेंही खरें ! जगांतील इतर स्वतंत्र देशांनीं जें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे त्या मानानें आम्हां हिंदुस्थानांतील लोकांच्या हातीं लागलेलें ज्ञान अणुमात्रच ठरेल. पदार्थशास्त्र, रसायनशास्त्र इत्यादि अनेक प्रांतांत पाश्चात्त्यांनीं जी प्रगति केली आहे तिच्याकडे पाहतां आम्ही मिळविलेलें ज्ञान केंविलवाणेंच म्हटलें पाहिजे ! त्यांच्या ज्ञानाचे अजस्र मेघ अंतरिक्षांतून हालतां हालतां आम्हां आळशांच्या डोक्यावर जे चार शिंतोडे क्वचित् पडत आहेत तेंच आमचें ज्ञान ! त्यांच्या मागोमाग आम्ही धांवण्याची बतावणी करतों आणि स्वतःला प्रगत समजतों येवढेंच ! त्यांच्या ज्ञानप्राप्तीच्या उद्गारांना रणगर्जना म्हटलें तर आमची प्रगतीची हांक म्हणजे कोल्हेकुईच म्हणावी लागेल ! ज्ञानविज्ञानाचे नवे नवे किल्ले सर करणारे ते खरे वीर, आणि आम्ही लढाईनंतरच्या धामधुमींत आणि लुटालुटींत काय चार जिनसा हातीं लागतील तेवढ्या घेऊन येणारे बाजारबुणगे ! मनुष्यजातीच्या ज्ञानाची खूप प्रगति झाली आहे हें विधान करतांना आम्हां हिंदी लोकांना मात्र ती प्रगति लागू नाहीं असें प्रांजलपणें लिहावयास नको काय असें मनांत आल्यावांचून रहात नाहीं.

मात्र चमत्कार असा कीं, पाश्चात्त्यांच्या मानानें विज्ञानांत आम्ही जरी अजून कित्येक शतकें मागेंच आहोंत, तरी जी कांहीं

थोडीशी भर आमच्या विज्ञानांत पडली आहे तिनें आमची श्रद्धा खिळखिळी करून टाकली आहे. आमच्या हातीं ज्ञान फारसें आलें नाहीं खरें, पण आधुनिक भौतिक ज्ञानाचा चष्मा डोळ्यावर चढल्याबरोबर जी नवी दृष्टि प्राप्त व्हायची ती आम्हांला प्राप्त झाली आहे. आमच्या पूर्वजांनीं ज्या गोष्टी उगीचच खऱ्या व महत्त्वाच्या मानल्या त्या वास्तविक अस्तित्वांतच नाहींत हें आम्हांला स्वच्छ कळूं लागलें आहे. आमच्या पूर्वजांनीं ज्या देवदेवतांचें अस्तित्व मानलें, व ज्यांची प्रसन्नता संपादण्यासाठीं यज्ञयागांचा धर्म रूढ केला त्या देवदेवता नसून केवळ निसर्गांतल्या विविध शक्ति आहेत असें आतां आम्हांस पुरतें कळून चुकलें आहे. निःश्रेयस साधण्यासाठीं ज्या धर्मगुरूंची महती आमच्या पूर्वजांनीं गाइली त्यांची आवश्यकता मानण्याचें प्रयोजन आज उरलेलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर निःश्रेयसाची पूर्वींची कल्पनाच भ्रामक असल्याचें आम्हांला उत्तरोत्तर अधिकाधिक पटत आहे. धर्म, मोक्ष, परमार्थ इत्यादि सर्वच कल्पनांची उलटापालट होण्याचा आजचा काळ आहे. ज्ञानाच्या प्रगतींतलि प्रत्येक पावलाच्या धक्क्यानें श्रद्धेच्या कित्येक उतरंडी गडगडत आहेत. चातुर्वर्ण्यावर आम्ही पिढ्यान्‌पिढ्या श्रद्धा ठेवली, परंतु तिनें आमचा घात केल्याचेंच आज आम्हांला स्पष्ट दिसत आहे. खाण्यापिण्यांत धर्म सांठलेला आहे असें आम्हीं आजपर्यंत मानलें; परंतु, आमच्या हिंदुसमाजाचें संख्याबल कमी होत असलेलें उघड्या डोळ्यांनीं स्वस्थ पहात बसण्याचा कुमकुवतपणा आमच्या हातून त्या श्रद्धेनेंच घडविला असें आतां वाटूं लागलें आहे. उत्तुंग शिखरांचीं प्रासादतुल्य सुवर्णमंदिरें बांधून परमेश्वराच्या मूर्तींचा बडिवार आज शतकानुशतकें आम्हीं केला; परंतु, या खोट्या भक्तीनें आमच्या समाजाचें कल्याण होण्याऐवजीं आमच्यांत कलह माजले, आणि आम्ही

शतकांत पाश्चात्य देशांत ‘ धर्म विरुद्ध शास्त्र ’ अशी झटापट सुरू झाली त्या वेळीं शास्त्रज्ञांना वाटलें, कीं एकदां धर्मरूपी अज्ञानांधःकार नष्ट केला, आणि ज्ञानसूर्याचा प्रकाश जिकडे तिकडे पसरविला, कीं अखिल मानवजाति शाश्वत सुखाच्या मार्गाला लागेल. शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें झाला, कीं भौतिक शास्त्रांचे सिद्धांत घरोघर माहित होतील, लोकांची अंधश्रद्धा आणि वेडगळ समजुती नाहींशा होतील, आणि समाज सुखी आणि बलिष्ठ होईल. बेन्थम नांवाच्या पंडितानें असें भाकित केलें होतें, कीं शिक्षणाचा प्रसार खरोखर चांगल्या तऱ्हेनें झाला तर अवघ्या एका शतकाच्या अवधींत मनुष्यापुढचे सारे प्रश्न सुटतील, आणि पृथ्वीवर रामराज्य नांदू लागेल. एका फ्रेंच पंडितानें असे उद्गार काढले होते, कीं ‘ आमच्या मागून येणारी नवी पिढी मोठी भाग्याची म्हटली पाहिजे. कारण, मानवी जीवितांत मोठ-मोठ्या क्रांत्या घडून आलेल्या त्यांच्या दृष्टीस पडणार आहेत ! ’

या भाकिताप्रमाणें क्रांत्या खरोखरच दृष्टीस पडल्या. फ्रान्स-मध्यें लोकसत्ता स्थापन झाली, वॉटरलू येथील रणसंग्राम झाला, मुकडेन येथील लढाई झाली, लेनिनचा अवतार झाला, भौतिक शास्त्रांची भरारी कल्पनेपलीकडे पोहोंचली. डार्विन, फॅरडे, डाल्टन, लाप्लास, पास्तर, आईनस्टीन असे एकाहून एक श्रेष्ठ रथीमहारथी अवतीर्ण होऊन त्यांनीं भौतिक शास्त्राचा झेंडा अटकेपार फडकाविला. पण, भौतिक ज्ञानानें राघूभरारीच्या वेगानें जी ही मजल मारली तिच्या योगानें माणसाला शाश्वत सुखाची, दृढ आशेची, आणि अढळ विश्वासाची प्राप्ति झाली काय ?—

या प्रश्नाला नकारार्थीच उत्तर द्यावें लागेल. भौतिक ज्ञाना-च्या प्रगतीचा उपयोग इतकाच झाला, कीं राष्ट्राराष्ट्रांतली स्पर्धा

वाढली, द्वेष वाढले, असंतोष वाढला. मारामारी आणि कापाकापी यांच्या लाल रंगानेंच मानवी जीविताचें चित्र अधिकाधिक रंगूं लागलें. पूर्वीच्या जुन्या श्रद्धा पार नाहींशा झाल्या, आणि निराशा आणि निरुत्साह मात्र वाढला. मनुष्य सुखी होण्याऐवजीं अधिक कष्टी मात्र झाला. मानवी जीविताचें कोडें उलगडण्याऐवजीं त्यांत गुंतागुंत मात्र अधिक दिसूं लागली. 'जगावयाचें कशासाठीं?' या प्रश्नाचा नीट उलगडा होण्याऐवजीं 'जगून तरी काय करायचें?' असा उद्वेग मात्र चहूंकडे माजला!

कारण, ज्योतिषशास्त्र सांगूं लागलें कीं, जी ही पृथ्वी ख्रिस्त, बुद्ध, शंकराचार्य यांजसारख्या पुण्यश्लोकांची अवतारभूमि समजली जाते ती म्हणजे विश्वाच्या अफाट पसाऱ्यांतील केवळ एक रजःकण आहे! सूर्यमंडलांत केव्हां तरी एक स्फोट होऊन हा पृथ्वीगोल जसा उद्भवला तसाच केव्हांतरी एकदां तो कोठें तरी धडकन् भस्मसात होणार आहे, आणि मानवी संस्कृति आणि इतिहास यांची साक्ष द्यावयास त्या राखेंतील एक कणसुद्धां शिल्लक उरणार नाहीं! भूगर्भशास्त्रवेत्ते सांगूं लागले, कीं या अफाट सृष्टींत अजस्र पर्वत आणि अथांग सागर यांचें निरंतर युद्ध चाललें आहे; पर्वतांच्या ठिकाणीं प्रचंड सागर निर्माण व्हावेत आणि समुद्र नाहींसे होऊन त्यांच्या जागीं पर्वतशिखरें दिसूं लागावींत असा त्या युद्धाचा चक्रनेमिक्रम अव्याहत चालू आहे व चालणार आहे; मनुष्यांनीं गजबजलेलीं खंडेंच्या खंडें भूकंपाच्या भक्ष्यस्थानीं आजपर्यंत पडत आलीं आहेत व पुढेंही पडणार आहेत; सारांश, पृथ्वीतलावर जीवमात्राचा विहार चाललेला दिसतो तो केवळ पंचमहाभूतें त्याच्या गमजा चालू देतात म्हणून! प्राणिशास्त्राचा निष्कर्ष असा निघाला, कीं शेंकडों तऱ्हेच्या प्राण्यांचा आजपर्यंत या पृथ्वीवर उद्भव आणि संचार झाला,

पण आज घटकेला कुठेंतरी कुजत पडलेल्या चार हाडांखेरीज त्यांचा मागमूसही उरलेला नाहीं ! वनस्पतिशास्त्रज्ञांनीं स्पष्ट सांगितलें, कीं एका जीवानें दुसऱ्या जीवास खावें आणि जगावें हाच सृष्टीचा न्याय आहे; बलिष्ठांनीं दुर्बलांना हरप्रकारें रगडावें आणि राबवावें हेंच जीवनाचें सार आहे; ज्याला जगावयाचें असेल त्यानें इतरांचे प्राण घेण्याची विद्या आणि शक्ति कमावली पाहिजे; संतति वाढविणें म्हणजे शुद्ध आत्मघात होय, आणि प्रेम म्हणजे जीविताच्या सिंहासनावर स्वतःऐवजीं दुसऱ्याची स्थापना करून आपल्या स्वतःच्या मृत्यूची पूर्वतयारी करण्याचा मूर्खपणा होय !

प्राणिमात्राच्या जीविताचा खेळ भौतिकशास्त्राच्या सत्य-कठोर दृष्टीनें पाहिल्यास किती क्षुद्र भासेल त्याचें एक उदाहरण म्हणून एक अमेरिकन तत्त्वजिज्ञासु लिहितो—'माझी एक कुत्री आहे. ती जन्माला कां आली ? तर तिच्या आईनें आणि बापानें एक-मेकाला हुंगलें आणि दोघें एकमेकांस आवडलीं म्हणून ! ती खाण्या-पिण्यांत मोठी अधाशी आहे; आम्ही छूः केलें कीं ती भुंकत धांवते; घरांतील उत्तम सुखासन पाहून त्यावर बसते, आम्ही तिच्यावर ममता करतों ती जणूं आम्ही केलीच पाहिजे असें दाखवते, आणि खंडोगणती कुत्र्यांची ब्याद आपल्या मागोमाग आमच्या दाराशीं आणते ! आमच्या शेजारच्या गृहस्थांचा एक 'एअरडेल' जातीचा कुत्रा आहे, तो तर रात्रभर तिच्यासाठीं आमच्या उंबरठ्याशीं बसतो, आणि विवळतो ! तें त्याचें विवळणें आणि मानवी प्रेम यांत अंतर तें काय ? त्याला काव्यगायन नीट साधत नाहीं इतकेंच कीं नाहीं ?

'पुढें ती गाभण राहते. विण्याच्या वेळीं तिला मनस्वी यातना होतात. या साऱ्या प्रकरणाचा अर्थ तरी काय असें विचारण्यासाठींच

जणूं कांहीं ती आमच्याकडे दीन मुद्रेनें पाहते, आणि 'कुं ऽऽऽ ऊं ऽऽऽ' असें विवळते. शेवटीं चार पांच पिलें तिच्या पोटांतून बाहेर पडतात. त्यांना ती चाटून चाटून स्वच्छ करते, नीट संभाळते आणि तीं सारीं एकदम तिच्या स्तनांवर हल्ला करून लचके तोडतात तरी तें ती सहन करते. आम्ही त्या पिलांपैकीं एकेक पिल्लू कोणाला तरी देऊन टाकतों. तें कुठें गेलें म्हणून ती घरभर शोधते, आणि जरा अस्वस्थ होते. पण तें एखाद दुसऱ्या दिवसापुरतेंच. मग ती त्यांना विसरते. अखेर तिचीं सगळीं पिलें दिलीं जातात. त्याचें तिला कांहीं वाटेनासें होतें. ती पुन्हा एखाद्या कुवारणीसारखी मजेंत राहूं लागते. पण अखेर पुन्हा प्रेमाचा ताप तिच्यांत—आणि गांवांतल्या कुत्र्यांतही-संचारतो, आणि मग भोग, गर्भ, प्रसूति या साऱ्या भानगडींचें चक्र पुन्हा सुरू होतें!'

माणसाची गति तरी तत्त्वतः हीच नाहीं का? लहान मोठ्या सर्वच प्राण्यांस पिलें होतात तशींच तीं स्त्रीपुरुषांसही होतात. त्यांचें महत्त्व आपण उगीचच मानतों म्हणून! शास्त्राच्या दृष्टीनें त्यांची विशेष थोरवी कांहींच नाहीं! जुन्या अज्ञानाच्या काळांत लोकांची समजूत असे, कीं माणसाच्या तान्ह्या मुलाला अमर आत्मा असतो; आतां आत्म्याची भाषा बोलणें वेडेपणाचें ठरेल. तान्ह्या मुलाला अनेकविध मांसग्रंथी असतात झालें! पदार्थशास्त्राच्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास तान्हें मूल म्हणजे अणूपरमाणूंचा गोळा! दुसरें काय? शारीर शास्त्राच्या दृष्टीनें तें मूल म्हणजे स्नायू, हाडें आणि ज्ञानतंतू इत्यादींची लिडबिडणारी गुंतागुंत! वैद्यकशास्त्राच्या दृष्टीनें, नाना व्याधींचें निवासस्थान! रॉबर्ट बर्न्स नांवाच्या कवीनें एकदां देवाजवळ मागणें मागितलें, कीं 'दुसऱ्यांच्या दृष्टीला आम्ही कसे दिसतों तें अम्हांला कळूं दे!' आधुनिक शास्त्रानें ही दृष्टि

आम्हांला दिली आहे. या सृष्टींत आम्हां मानवांचें स्थान किती क्षुद्र आहे तें आतां अगदीं उघड झालें आहे. माणसाकडे पाहून कुत्र्यांना वाटत असेल, उगीच वायफळ बडबड करणारे विचित्र प्राणी आहेत झालें! आणि डांसांना विचारलें तर म्हणतील अहो, हीं माणसं ना, हीं तर आमच्या मेजवानीसाठीं सुसज्ज ठेवलेलीं ताटं! सारी सृष्टि माणसाभोंवतीं फिरत आहे, आणि त्याच्या लहरीप्रमाणें नाचत आहे, मनुष्य म्हणजे विश्वकर्म्याच्या कौशल्याची पराकाष्ठा, असल्या बड-बडींत सत्यांश काडीचा नाहीं. आधुनिक शास्त्राच्या दृष्टीनें आम्ही आणि आमची मानवजाति म्हणजे 'किस दरयामें खसखस!' वेळ आली कीं वाऱ्यावर उडून जायला एका क्षणाचाहि अवधि लागणार नाहीं!

आणि आधुनिक शास्त्रीय ज्ञानाच्या प्रकाशांत मानवी जीवि-ताचें जें क्षुद्रत्व प्रत्ययाला आलें आहे तेंच इतिहासाच्या दप्तरींहि पृष्ठापृष्ठावर लिहिलेलें नाहीं काय? इतिहासाच्या अध्ययनाचा निष्कर्ष काय?—तर शेंकडो संस्कृती, मानववंशाच्या वंश आणि साम्राज्यांच्या साम्राज्यें घडीभर डौलानें फुगलीं आणि अखेर बुडबुड्यासारखीं फुटलीं! पुराणसंशोधनावरून असें दिसतें कीं, आतांपर्यंत निदान एक डझन मानववंश उदयास येऊन अस्तंगत झाले असतील; त्यांपैकीं एकेक वंश हजारों वर्षे दिमाखानें नांदला, पण त्या सर्वांचा आज घटकेला अवशेष काय उरला आहे? तर चार गारगोट्या आणि फत्तरावरच्या रेघोट्या! त्यासुद्धां आम्ही कुदळीफावडीं घेऊन घेऊन खणीत बसूं तेव्हां कधीं काळीं सांपडायच्या! पेरू, युकातन, ऊर, मोहेंजो-दारो असलीं स्थळें म्हणजे पूर्वी एके काळीं गाजलेल्या संस्कृतीच्या कबरीच! आपण खणायचें काम केलें म्हणून या संस्कृतींच्या अस्थी तरी आपल्या दृष्टीस पडल्या! पण ज्यांचा आप-

त्याला अजून मागमूसही नाहीं अशा कितीतरी दुसऱ्या संस्कृती काळाच्या आणि जमिनीच्या उदरांत गडप झालेल्या असतीलच कीं नाहीं !

म्हणजे माणूस रंगभूमीवर मारे थैमान घालीत आहे खरा, पण त्याच्या डोक्यावर सर्वसंहारक शिवाचें तांडवनृत्य चाललेलें आहे ! साम्राज्यामागून साम्राज्यें एकमेकांस खाऊन टाकीत आलीं आहेत ! ईजिप्तनें साम्राज्य बांधलें, पर्शियानें तें उध्वस्त केलें; पर्शियानें जें बांधलें त्याचा ग्रीसनें विध्वंस केला; ग्रीसचा संहार रोमनें केला; इस्लामी साम्राज्य स्पेननें रसातळाला नेलें; स्पेनचा सर्वनाश इंग्लंडनें केला; आणि आतां अखेर युरोप स्वतःची हत्त्या स्वतःच करण्याच्या विचारांत आहे !

सारांश, भौत्तिकशास्त्र व इतिहास यांच्या अध्ययनानें मनुष्य अगदीं निराशावादी बनण्याचा संभव आहे. पूर्वीं समाजधुरंधरांना वाटलें होतें, कीं माणसाला स्वतःच्या जीविताच्या व निसर्गाच्या रहाटीच्या नियमांचें ज्ञान अधिकाधिक होत गेलें कीं तो अधिकाधिक सुखी आणि कार्यतत्पर होत जाईल. पण घडलें तें या अपेक्षेच्या बरोबर उलट. परलोकची कल्पना सर्वस्वीं निराधार असल्याचें मनुष्याला कळून चुकलें; आणि इहलोकांतील जीविताची थोरवी मानण्याचें त्याला कांहीं कारण उरलें नाहीं ! भौतिक ज्ञानाच्या रुळाखालीं सगळ्याच श्रद्धेचा चक्काचूर उडाला. कशाचें म्हणून पावित्र्यच शिल्लक राहिलें नाहीं ! परिसाचा स्पर्श होतांच लोखंडाचें सोनें होतें, पण भौतिक शास्त्राची किमया अशी सैतानी, कीं तिचा स्पर्श होतांच सोन्यासारख्या मोलाच्या कल्पनांचीं राखुंडी व्हावी ! त्यामुळें परमेश्वर, आत्म्याचें अमरत्व, मानवतेचें श्रेष्ठत्व, महात्म्यांचा

अवतारीपणा—सगळ्याच कल्पना लयाला गेल्या, आणि जीवनांतली सारी मौज नाहींशी झाली ! प्रयत्न, महत्त्वाकांक्षा, पराक्रम, इत्यादि सगळ्या गोष्टी जर क्षुद्र कीटकांच्या हालचालींसारख्या, तर या संसारांत अमुक करायचें आणि तमुक करायचें ही बडबड तरी कशाला, आणि धडपड तरी कशासाठीं ?—

असा निरुत्साह आजच्या या नव्या मनूंत लोकांच्या मनांत माजणें शक्य आहे. वर वर्णिलेल्या कारणांस पुष्टि देण्यासारखीच आमच्या भोंवतालची बाकीची परिस्थिति आहे. धर्माधर्मांत कलह माजले आहेत, जातींजातींचीं वैरें संपत नाहींत, व्यापार बसला आहे, पैसा आणि धंदा दुर्मिळ झाला आहे, पदवीला कुणी पुशीत नाहीं, आणि राहणी तर अधिकाधिक खर्चाची झाली आहे ! वैतागानें आत्महत्त्या करणाऱ्या एका तरी व्यक्तीचा उल्लेख वृत्तपत्रांत रोज आढळतो. या आत्महत्या म्हणजे सामान्य जनतेच्या मनांतील सार्वत्रिक निराशेचे व निरुत्साहाचे उद्रेकच म्हटले पाहिंजेत ! आपल्या अंतःकरणांत कसली आस्थाच उरली नाहीं ! गेल्या महायुद्धामुळें मानवजातीचा भयंकर संहार झाला व व्यापार बुडाला, असें म्हणतात. पण आजच्या पिढीचें खरें दुर्दैव महायुद्धांत तीन कोटी माणसांचे मुडदे पडले हेंही नव्हे, किंवा सगळ्या देशांच्या तिजोऱ्या रिकाम्या झाल्या हेंहि नव्हे ! आपलीं अंतःकरणें रिकामीं झालीं आहेत यांतच खरा धोका आहे.

म्हणूनच प्रारंभीं म्हटलें कीं अर्जुनासारखीच साऱ्या माणसांची आज मनःस्थिति झाली असली तर तें साहजिक होय. त्यांना श्रद्धा उरली नाहीं, कर्तव्यनिश्चय करतां येत नाहीं, सारीं माणसें भांबावून गेलीं आहेत. श्रीकृष्णाच्या गीतेसारखी गीता कोणी सांगितली तरच त्यांच्या जीवितांत उत्साह आणि पराक्रम येण्याचा संभव आहे.

— पण या आधुनिक काळांत गीता कोठून कानीं पडणार?

— कां नाहीं?

— आज घटकेला विविध कार्यक्षेत्रांत ज्या व्यक्ती सर्व जगाच्या अग्रपूजेस पात्र ठरल्या आहेत, त्यांस आपल्या मनाचा संभ्रम निवेदन केला, आणि मार्ग विचारला तर? त्यांजकडून जो संदेश मिळेल त्याला 'आधुनिक गीता' असें नांव द्यावयास काय हरकत आहे?

असा विचार करून Will Durant नांवाच्या एका अमेरिकन पंडितानें जगांतील पंचवीस तीस थोर थोर व्यक्तींची निवड करून त्यांचा संदेश मागण्यासाठीं त्यांस एक पत्र पाठविलें.

तें पत्र असें :—

'नमस्ते!

'आपण आपल्या कार्यमग्नतेंतून थोडी सवड काढून माझ्याबरोबर तत्त्वचर्चेचा खेळ खेळाल काय?

'मानवी जीविताचा हेतु आणि अर्थ तरी काय, या प्रश्नाचा मी विचार करूं पहात आहे. मला वाटतें, इतर कोणत्याही प्रश्नापेक्षां हाच प्रश्न आजच्या पिढीपुढें पुनः पुन्हा उभा राहण्यासारखा आहे; आणि याचें उत्तर मात्र सहसा सांपडण्यासारखें नाहीं!

'या प्रश्नाचा उलगडा करण्यासाठीं आजपर्यंत कांहीं थोड्या पंडितांनीं खटपट केली नाहीं. पण या बाबतींत मानवी बुद्धि जों जों पुढें गेली तों तों तिचा पराभवच होत गेला आहे. ज्ञानाची प्रगति होत गेली तसतसें जीविताचें स्वारस्य आणि महत्व नष्ट होत गेलें आहे. आमच्या वाडवडिलांनीं ज्ञानाचा वर मागितला, आणि तो माणसाला मिळालाही. पण तो वर नसून शाप ठरला आहे. ज्ञानाच्या वाढीनें मानवजातीचा सारा उत्साह नष्ट झाला आहे!

'कारण, आज एक सोडून शंभर शास्त्रें परिपक्वता पावलीं आहेत खरीं, पण त्या सर्वांचा निष्कर्ष एवढाच निघतो, कीं मानवी जीवित अत्यंत क्षुद्र गणलें पाहिजे. औद्योगिक क्रांतीमुळें कुटुंब-संस्थेचा चुराडा उडाला आहे; गर्भप्रतिबंधक उपायांनीं संतति, नीति आणि कदाचित् सबंध मानवजातीही नष्ट होणारसें दिसत आहे; लग्नाला तात्पुरत्या सवद्याची अवकळा येत आहे; आणि प्रीति म्हणजे तरी कांहीं पवित्र भावना होय असें आतां कोणी मानतात कीं नाहीं कोणास ठाऊक! लोकसत्ताक राज्यपद्धति सुरू झाली कीं लोक सुखी होतीलसें वाटलें होतें, पण त्या पद्धतीच्या परिणामांकडे पाहिलें, कीं यापेक्षां जुन्या काळची सुलतानशाही पुरवली असें म्हणणें भाग पडतें. माणसामाणसांत सख्य नांदू लागून रामराज्य होण्याचीं सारीं सुखस्वप्नें लयास जात आहेत. माणसाचा लोभीपणा उलट वाढतच आहे. ज्ञानाचा आणि कल्पकतेचा उपयोग बलिष्ठांनाच होत आहे, व गरिबांस त्यामुळें अधिकाधिक केंविलवाणें दुर्बलत्व येत आहे! नवीं नवीं यंत्रें निघताहेत तीं माणसांना बेकार करताहेत, आणि संहाराचीं साधनें वाढवीत आहेत!

'म्हणजे मनुष्याला ज्ञान प्राप्त झालें ही एक मोठीच चूक झाली म्हणायची! त्या ज्ञानानें आम्हांला खरें स्वातंत्र्य आणि सौख्य मिळालें नाहीं तें नाहींच; उलट ज्या वेड्या समजुतींनीं आमचें लटकें कां होईना पण थोडेंबहुत समाधान होत होतें त्यांना आम्ही पारखे झालों, व ज्या बंधनांनीं आम्हाला खोटी कां होईना पण सुरक्षितता वाटत होती तीं मात्र कायमचीं तोडलीं गेलीं! आम्ही या ज्ञाना-मागें धांपा टाकीत कशाला धांवलों असें आतां वाटत आहे!—

'मग?—हें मानवी जीवित खरोखरीच फोल आहे असें मानून आम्ही सामान्य माणसांनीं कर्मसंन्यास घ्यावा काय?—

'हा प्रश्न नुसत्या पोकळ वेदान्तानें सोडविण्यापेक्षां आपल्या-सारख्यांच्या मनमोकळ्या अभिप्रायानें अधिक चांगल्याप्रकारें सुटण्या-सारखा आहे. कारण, आपण कर्मवीर आहांत. जीविताच्या युद्धाच्या ऐन गर्दींत आपण घुसलेले आहांत, आणि युद्धांत विजयश्री मिळ-विली आहांत ! तेव्हां थोडी सवड काढा, आणि आम्हाला सांगा—

'या मानवी जीविताच्या पसाऱ्याची संगति आपण कशी लावतां ? त्याच्या बुडाशीं कोणतें अंतिम तत्त्व आहे असें आपण मानतां ? आपणांस कार्य करायला स्फूर्ति कोठून होते ? आपली श्रद्धा कशावर आहे ? धर्माचा आपल्याला आधार वाटतो काय ? आपली शांति, समाधान आणि विसांवा कशांत आहे ? सारांश, आपल्याला कोणता ठेवा मिळवायचा आहे म्हणून एवढा प्रचंड खटाटोप करतां ?

'आपणांस वेळ नसेल तर या प्रश्नांचीं उत्तरें थोडक्यांत दिलीं तरी चालतील. सवड असेल, आणि विस्तारपूर्वक लिहाल तर फारच उत्तम. कारण, आपला एकेक शब्द मी फार मोलाचा मानतों.'

विल डयूरंट यांच्या या पत्राला जीं उत्तरें आलीं त्यांचा संग्रह 'On the Meaning of Life' अशा मथळ्याखालीं त्यांनीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला आहे. या संग्रहांत महात्मा गांधींपासून तों न्यूयॉर्क येथील तुरुंगांत जन्मठेपेची शिक्षा भोगत पडलेल्या एका तरुणापर्यंत अनेक मनोवृत्तींच्या लोकांचीं उत्तरें आहेत. मराठी वाचकांस यांतील निवडक पत्रें सादर केल्यास जगांतील मोठमोठ्या विद्वानांच्या विचारांशीं त्यांचा परिचय होईल, व मानवी जीविताकडे पाहण्याची तर्कशुद्ध, धीट व प्रामाणिक दृष्टि त्यांस प्राप्त होईल असें वाटल्यावरून तीं पत्रें आम्ही पुढें उद्धृत केलीं आहेत.

---

# श्री. जवाहरलाल नेहरू

## यांचा संदेश.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

तुमच्या पत्रांत तुह्मीं उपस्थित केलेले प्रश्न मोठे मनोवेधक आणि तसें म्हटलें तर जरा भयानकही आहेत. कारण पत्रांतल्या पूर्वपक्षाबरोबर वहात गेलें कीं वाटूं लागतें, खरेंच, सृष्टीचा हा पसारा हेतुशून्य आहे, आणि मानवी प्रयत्न व्यर्थ आहे. या प्रश्नांबद्दलचें माझें मत तुम्ही विचारतां, पण तें देण्याचा माझा अधिकार नाहीं असें मला वाटतें. मला सध्यां सवड नाहीं हें तर झालेंच, पण ती असती तरी तुह्मीं उपस्थित केलेल्या शंकांचें सविस्तर निरसन करणें मला कठीणच गेलें असतें.

आम्ही हिंदू लोक मोठे वेदान्तप्रिय समजले जातों खरे, पण मी मात्र सदा वेदान्तापासून चार पावलें दूरच राहिलों आहे. कारण पहिल्यापासूनच मला असें वाटूं लागलें कीं, वेदान्तानें माझ्या बुद्धीचा गोंधळ अधिकच होतो, आणि त्यानें मला मनःशांति किंवा कार्यस्फूर्ति मिळत नाहीं ती नाहींच ! धर्माचाहि माझ्या मनावर कधीं फारसा पगडा बसला नाहीं. पांडित्य मिळवायसाठीं आणि मिरवायसाठीं आपण सगळेच करतों त्याप्रमाणें मीहि विविध भौतिक शास्त्रांत लुडबुड केली. त्यांत माझें चित्त थोडेसें रमलें, आणि माझी दृष्टीही जरा व्यापक झाली. पण तरीही माझ्या बुद्धीला स्थिरता आली नाहीं. माझ्या मनांत अनेक शंका राहिल्या. मी कांहींसा नास्तिकच राहिलों. मलाच ज्यांचें स्पष्ट स्वरूप नीट कळत नव्हतें अशा अनेक सामाजिक व राष्ट्रीय

ध्येयांचा मला ध्यास लागला, आणि हळूहळू जणूं कांहीं त्या साऱ्या अस्पष्ट कल्पना एका मोठया कल्पनेंत विलीन होऊन हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हेंच माझें ध्येय ठरलें. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य म्हणजे केवळ राज्यकारभाराचे अधिकार असें मीं मानलें नाहीं; तर माझ्या कोट्यावधि बंधुभगिनींची दुःखांतून व गुलामागिरींतून मुक्तता करणें म्हणजेच देश स्वतंत्र करणें होय असें मी नेहमीं समजत आलों. इतकेंच नव्हे, तर माझा देश म्हणजे गुलामगिरींत पडलेल्या जगांतल्या सगळ्या दुःखितांचें एक प्रतीकच होय असें मला वाटूं लागलें, आणि देशाभिमानाऐवजीं मनुष्यजातीचा अभिमान धरून जगांतल्या सर्व देशांतल्या गरिबांचा कैवार घेऊन मी कार्य करूं लागलों.

पण या कार्यांतही शंका, कुशंका, निराशा अनुभवास येत. जे घडवून आणावेसें तळमळीनें वाटे त्याच्या मार्गांत नाहीं नाहीं तीं विघ्नें येत. मग कर्तव्य समजेनासें होई, व मन गोंधळून जाई.

अशा वेळीं गांधींची माझी गांठ पडली!

त्यांनीं जो मार्ग दाखविला त्यानें कार्यसिद्धि होईलसें दिसलें. निदान त्या मार्गानें जाऊन पाहाण्यासारखें आहे, व त्या मार्गानें गेल्यास माझ्या हृदयांत इतके दिवस ज्या भावना आणि महत्त्वाकांक्षा कोंडून ठेवाव्या लागल्या होत्या त्यांना वाट मिळेल असें मला वाटलें. मीं त्यांच्या कार्यांत उडी ठोकली, आणि काय आश्चर्य, इतके दिवस मी जें समाधान शोधीत होतों तें मला मिळालें! मला उमजलें, कीं, **खरें समाधान सतत काम करण्यांत—ज्या दिव्य उद्योगांत माझें मन रमलें तो उद्योग अविश्रांतपणें करण्यांत आहे! विचार किंवा वेदांत नव्हे, तर अविरत उद्योग म्हणजेच शांतिसमाधानाचा अखंड झरा होय!**

हा उमज पडल्यापासून माझ्या अंगीकृत कार्यासाठीं झगडण्यांत मीं आपलें शक्तिसर्वस्व घालीत आलों आहे; व त्यामुळें मला जें समाधान मिळालें त्यानें माझा विश्वास वाढत गेला आहे. कारण माझ्या जीविताला अर्थ असल्याचा मला प्रत्यय आला. आणि मानवी जीवनाचा हेतू कळत नव्हता तो कळलासें वाटूं लागलें! हा लाभ काय लहान सहान म्हणायचा?

हें जें मी सांगतों त्यानें तुम्हीं उभ्या केलेल्या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर मिळतें असें म्हणतां येणार नाहीं. पण मी कोणी तर्कतीर्थ किंवा वेदांती नाहीं. मी शिपाई बाण्याचा माणूस आहे. उद्योग आणि कष्ट करायला मिळाले म्हणजे खुषींत असावें अशा वृत्तीच्या माणसांपैकीं मी आहे. त्यामुळें तर्कशास्त्रानें किंवा भौतिक शास्त्रांच्या नियमांनीं सिद्ध होणारें उत्तर मला देतां येत नाहीं. शास्त्रें, न्याय, तर्कबुद्धि यांवर मी विश्वसलों होतों, व अजूनहि त्यांची किंमत मी मानतों; परंतु पुनः पुन्हा त्यांच्या लुलेपणाचा प्रत्यय येतो, आणि त्यांहून वेगळ्या आणि अधिक बलिष्ठ शक्तींनीं जीविताचा चक्रनेमिक्रम चाललेला आहे असें मनाला स्पष्ट पटतें. या शक्तींना उपजत बुद्धि, दुर्दम्य प्रेरणा कांहींही नांवें द्या, पण तर्काच्या व भौतिक शास्त्रांच्या चौकटींत त्या शक्ती बसत नाहींत येवढें खास! इतिहासाच्या पानापानावर प्रतीत होणारा सम्राटांचा आणि शककर्त्यांचा दुबळेपणा, अवतारी पुरुषांच्या दिव्यांसहि न जुमानतां चालूच रहाणारी माणसाची पापवृत्ति, मानवतेचा होत चाललेला ऱ्हास, आणि मानवजातीस अधःपाताकडे नेणारीं नवीं नवीं संकटें—यांचा विचार मनांत आला कीं माझें अंतःकरण निराशेनें व्याकूळ होतें. पण इतकें असूनही मला आपलें वाटतें, कीं माझ्या देशाला आणि एकंदर मानवी जातीला चांगले दिवस पाहायला मिळणार आहेत; व आमच्या

मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं जें युद्ध आम्ही करीत आहोंत त्यानें हा भाग्यकाल अधिक जवळ येत आहे !

या आशावादाचें समर्थन करायला मला सांगू नका. कारण तें मला करतां येणार नाहीं. मला इतकेंच सांगतां येईल कीं एका महत्कार्यांत मी माझी अल्प शक्ति वेंचीत आहे, आणि माझे कष्ट फुकट जावेत हें संभवत नाहीं. या भावनेंतून मला पुरेसें समाधान, शांति, आणि चित्तस्थैर्य मिळतें ! माझें ध्येय लवकर प्राप्त व्हावें अशी मला उतावळी वाटते. पण, खरें विचाराल तर, **माझ्या उद्योगाच्या फळाबद्दल मी तितकीशी फिकीर बाळगीत नाहीं.** माझा उद्योग योग्य मार्गानें चालला आहे अशी माझी मनोमय खात्री असली म्हणजे **त्या उद्योगांतच माझी सारी शांति, माझें सारें समाधान मला मिळतें !**

सामान्यपणें सोशिआलिस्ट तत्त्वानुसार मी सर्व गोष्टींकडे पाहतों; व हिंदुस्थानांत व जगांत इतरत्रही सोशिआलिस्ट तऱ्हेची राज्यपद्धति प्रस्थापित व्हावी अशी माझी इच्छा आहे. जगांतलें सारें वैगुण्य नाहींसें झालें म्हणजे काय काय होईल तें मला सांगतां येणार नाहीं, व त्याबद्दल विचार करावासाही मला कधीं वाटत नाहीं. **आज तावडतोब केल्या पाहिजेत अशा कितीतरी गोष्टी आहेत, व तेवढा उद्योग मला पुरेसा आहे !** जग कधीं पूर्णावस्थेस पोंचेल कीं नाहीं, किंवा आज आहे त्याहून तरी पुष्कळसें अधिक चांगले होईल किंवा नाहीं, असल्या प्रश्नांचीं उत्तरें द्यायचें धाडस मी करणार नाहीं. पण जग सुधारण्यासाठीं कांहीं तरी करतां येईल खास अशी माझी **श्रद्धा आणि आशा आहे; व म्हणून मी उद्योगांत खंड पडूं देत नाहीं !**

'मानवी जीविताचा अर्थ व हेतु काय?' या तुमच्या मुख्य प्रश्नाची मी टाळाटाळच केली आहे असें तुम्ही कदाचित् म्हणाल. तें खरेंहि आहे. पण मी या जीविताकडे कोणत्या दृष्टीनें पाहतो, व माझ्या उद्योगांत मला चालना देणारे कोणते विचार असतात तें सांगण्यानेंच तुमच्या प्रश्नाचें उत्तर देतां येईल असें मला वाटलें, आणि म्हणून तें सांगून टाकलें.

आपला,

**जवाहरलाल नेहरू**

जगप्रसिद्ध नाटककार

**बर्नार्ड शॉ**

यांचें उत्तर.

या जीविताचा अर्थ काय असें तुम्ही मला विचारतां. पण कोणी बेट्यानें तुम्हांस सांगितलें मला माहीत आहे? तुमचा प्रश्नच अर्थशून्य नाहीं कां?

---

अमेरिकेंतील प्रमुख वृत्तपत्रकार
## एच. एल्. मेनकेन
यांचें मत.

जीवितापासून मला कोणतें समाधान मिळतें व मी सतत उद्योग कां करीत राहतों असा तुमचा प्रश्न आहे. कोंबडीला जर विचारलें, बाई तूं अंडीं कां घालतेस, तर तीं जें कारण सांगेल तेंच माझ्या उद्योगाचें कारण आहे. स्पष्ट न कळणारा पण अतिशय जबरदस्त असा जिवंत राहण्याचा हट्ट प्रत्येक जीवाच्या ठिकाणीं आहे. जिवंतपणावांचून जीवित शक्य नाहीं. उद्योगाचा जंगी स्फोट झाल्यानंतर थोडी विश्रांति म्हणून कर्मशून्यता चालेल. पण एरव्ही ती दुःखदायकच होईल आणि जीवाच्या आरोग्यास विघातक झाल्या-वांचून राहणार नाहीं. अनुवंशिक संस्काराच्या न्यायानुसार प्रत्येक व्यक्ति कांहीं विवाक्षित शक्तींच्या सामुग्रीनिशीं या जगांत प्रवेश करीत असते; व त्या व्यक्तीच्या उद्योगाचें स्वरूप या सामुग्रीनें निश्चित होत असतें. कोंबडी अंडीं घालते पण मी घालीत नाहीं, कारण तसें करण्यास लागणारीं साधनें निसर्गानें मला दिलीं नाहींत. कायदे-मंडळाच्या निवडणुकीस मी उभा रहात नाहीं, व्हायोलिन वाजवीत नाहीं, एखाद्या कॉलेजांत तत्त्वज्ञान शिकवीत नाहीं, किंवा एखाद्या गिरणींत नोकरी धरीत नाहीं, याचें तरी कारण काय ? हेंच, कीं या गोष्टी आपल्याला जमायच्या नाहींत, त्यासाठीं आपण नाहीं असें मला वाटतें. जें सगळ्यांत अधिक साधेलसें वाटतें तें मी करतों. जन्मतः तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना करण्याचा मला छंद आहे. त्यांत मला अवीट गोडी वाटते म्हणून सारखें कल्पनांशीं खेळत बसावेंसें मला वाटतें. तसेंच कल्पनांची भाषेंत मांडणी करण्याचें कसब निसर्गतःच माझ्यामध्यें विशेष आहे. या कारणामुळें मी लेखक व

वृत्तपत्रकार बनलों आहे. म्हणजे कल्पनांची निपज करून त्या लोकांना विकत द्यावयाचा माझा धंदा आहे म्हणाना !

यांत हेतूपूर्वक योजनेचा भाग मला फारसा दिसत नाहीं. मी सध्यां जें करतों तें मीं करावें असें नियतीनें ठरलें म्हणून मी करतों. मीं तें पसंत केलें व ठरविलें म्हणून नव्हे ! लहानपणीं मला वाटे, रसायनशास्त्रांत पारंगत व्हावें. माझ्या वडिलांना बिचाऱ्यांना वाटे आपल्या मुलानें व्यापारधंदा करावा आणि नांव करावें. गरिबी मनाला टोंचत असली कीं कोणाही माणसाच्या मनांत येतें त्याप्रमाणें माझ्याहि वारंवार येई, कीं सट्टा, शर्यत अशा कांहींतरी युक्तीनें एकदम घबाड मिळवावें ! पण इतकें असूनही अखेर मी झालों लेखक, आणि जीविताचें हें प्रकरण संपेपर्यंत लेखकच राहणार ! गाईनें दुधाच्या ऐवजीं अमृताची धार दिली तर मालक तिचा कितीतरी अधिक बडेजाव ठेवील हें खरें. पण गाईला हें कळलें तरी उपयोग काय ? ती जन्मभर दूधच देत राहणार, नाहीं का ?

तसेंच गाय धारेला उभी राहते ती काय त्यांत गवळ्याचा फायदा आहे हें तिला माहीत असतें म्हणून ? छे, छे ! धार काढली कीं तिला स्वतःला बरें वाटतें म्हणून ! तसेंच लेखकाचेंहि आहे. कोणाला उपदेशामृत पाजायसाठीं किंवा कोणाची खुषामत करायसाठीं मी लिहित नाहीं. माझ्या समाधानासाठीं मी लिहितों. जें मी लिहितों तें तर्कशुद्ध, लोकांना पटण्यासारखें ठरलें तर बरें असें मला वाटतें; पण खरें म्हणजे, त्याबद्दल मी फारशी फिकीर बाळगीत नाहीं. कल्पनानिर्मित्तीचा आनंद मला पुरेसा आहे.

म्हणजे असें, कीं, **जें काम मला साधतें आणि बरें वाटतें त्यांत मला शांती, समाधान मिळतें;** आणि याच्या खालोखाल

माझ्या समाधानाचें साधन कोणतें म्हणून विचाराल तर **माझ्या कुटुंबांतील मंडळी आणि मित्रपरिवार.** बायको, मुलें, व आप्त यांच्या सहवासांत मी सुखी असतों. मित्रमंडळींशीं गप्पाविनोद आणि गुजगोष्टी करायला मिळाल्या कीं मी आनंदांत असतो. माझ्या-प्रमाणेंच माझ्या मित्रांना संगीताची आवड आहे. संगीताइतका उत्कट आल्हाद दुसऱ्या कशांत नसेल असें मला वाटतें. त्याविषयींची माझी लुब्धता आणि निष्ठा सारखी वाढत आहे.

धर्माकडे माझा यत्किंचितही कल नाहीं. धार्मिक प्रवृत्ति माझ्या अंतःकरणांत उसळलेल्या मला कधीं आठवत नाहींत. **आम्ही ख्रिश्चन लोकांनीं ईश्वरपूजेचा जो प्रकार रूढ केला आहे त्यानें माणूस उदात्त होण्यापेक्षां लांछित व पतित मात्र होतो** असें मला वाटतें. ती पूजा करायची म्हणजे माणसानें गुलामासारखे सदा ' पतित मी पापी ! ' असे म्हणून लोळण घ्यायची ! आणि ती कोणापुढें ? तर अशा देवापुढें, कीं जो खरोखरच अस्तित्वांत असेल तर त्याचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याऐवजीं निर्भर्त्सना करणें अधिक उचित ठरेल ! परमेश्वराचें परमदयाळुत्व कां काय म्हणतात त्याचा मला तर या जगांत कांहीं मागमूस दिसत नाहीं, उलट, त्याची जी करणी रोजच्या रोज दृष्टीस पडते तीवरून बोलायचें झालें तर स्वारी बुद्धीनें कमालीची जड आणि अंतःकरणानें कठोर व दुष्टच असली पाहिजे !

**आत्म्याचें अमरत्व मला खरें वाटत नाहीं, आणि तें खरें असलें तरी मला हवेंसें वाटत नाहीं.** या संसारांत आपल्याहून अधिक सुखी माणसें दिसलीं कीं त्यांचा आपल्याला मोठा हेवा वाटतो, व मग ' बरं आहे, पुढच्या जन्मीं मी मोटारींत बसेन आणि तूं पायपिटी करशील कीं नाहीं बघ ! ' असें मनांत तरी म्हणतां

यावेसें वाटतें. येवढी सोय पुनर्जन्माच्या व अमरत्वाच्या कल्पनेनें माणूस करून घेतो, दुसरें काय ?

मानवी जिविताचा अर्थ काय तें मला सांगतां येणार नाहीं. कांहीं अर्थ नाहींच असा माझा तर्क वाहतो. मला येवढेंच म्हणतां येईल, कीं **या जीवितांत मोठी गंमत आहे. त्यांतल्या दुःखांत-सुद्धां !** या दुःखांमुळेंच धैर्य आणि तत्सम उमदे गुण माणसाच्या अंगीं येतात. ईश्वराशीं झुंज करून त्यावर जो विजय संपादन करतो त्या माणसाला मी महात्मा म्हणेन. मरण आलें, कीं खेळ खलास या कल्पनेंत मला खेद अगर भय वाटत नाहीं. नाटक कितीहि चांगलें असलें तरी त्याला अंत असरणारच !



नोबेल पारितोषक मिळविणारे अमेरिकन कादंबरीकार

## सिंक्लेर लुइस

यांचे विचार.

**धर्मावांचून माणसाला जीविताची किंमत वाटायची नाहीं आणि दुःखाच्या वेळीं आधार सांपडायचा नाहीं असें समजणें चुकीचें आहे.** ही भीति कोणाला वाटते ? तर ज्यांच्या मनावर लहानपणीं धार्मिक संस्कर झाले आहेत, ज्यांचे सारे आचार-विचार धर्माच्या चाकोरींत लहानपणींच पडले आहेत, व त्यामुळें मोठेपणीं धर्माच्या कल्पनेवांचून ज्यांना चुकल्यासारखें होतें, त्यांना ! माझ्या परिचयाची अशी किती तरी तरुण मंडळी आहेत, कीं ज्यांना धार्मिक शिक्षणाच्या अगर देवदेवळांच्या कल्पनेचा लहानपणापासून गंधही नाहीं. त्यांच्या ठिकाणीं भरपूर समाधान आणि कार्यनिष्ठा मला दिसते. आपल्या दुःखाचीं गाऱ्हाणीं परमेश्वराला अगर त्याच्या उपाध्यायरूपी मुनीमाला निवेदन करण्याची ज्यांना संवय आहे अशा धर्मपरायण माणसांइतकींच हीं धर्मशून्य माणसेंहि सुखासमाधानांत आहेत. संसारांतल्या कर्तव्याविषयींची तत्परता व तळमळ यांच्यांतही तितकीच आहे ! निकोप प्रकृति राखतां आली, टेनीस खेळण्या-सारखी शारीरिक मेहनत किंवा ज्योतिःशास्त्रांतला एखादा बिकट प्रश्न सोडविण्यासारखे मानसिक श्रम करतां आले, कीं हीं माणसें आनंदांत असतात !

**माणूस वृद्ध झाला कीं आस्तिक बनतो व देवधर्म करा-यला लागतो या म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं.** कारण धर्म-संस्कारावांचून वाढलेलीं आणि वृद्धावस्थेस पोंचलेलीं माणसेंही माझ्या पाहण्यांत आहेत. त्यांची शांति ढळलेली नाहीं. आपल्यांतले सुप्रसिद्ध अज्ञेयवादी क्लॅरन्स डॅरो ( Clarence Darrow ) आज चौऱ्याहत्तर

वर्षांचे आहेत. पण त्यांच्या उल्हासांत आणि जीविताविषयींच्या तीव्र लालसेंत कांहीं कमतरता नाहीं. मी तर म्हणेन, या बाबतींत कोठलाही वृद्ध धर्माधिकारी त्यांजपुढें फिका पडेल. कारण धर्माधिकाऱ्याचें असें असतें, कीं त्याला स्वर्गाची आशा वाटते खरी, पण त्याहीपेक्षां न जाणो देव आपल्याला नरकांत तर टाकणार नाहीं ना अशा धास्तींतच तो बिचारा जास्त असतो !

एखाद्या नाटकाला मी गेलों म्हणजे त्यांत माझें चित्त रमतें. त्या नाटकाचा लेखक अगर सूत्रधार ईश्वर नाहीं, तें अनंत नसून दोनतीन तासांत खलास होणार आहे, त्याची मला फारशी आठवणही फार वेळ राहणार नाहीं, आणि त्यापासून मी कांहीं सदाचार शिकणार आहे असेंहि नाहीं. या सगळ्या गोष्टी पक्क्या ठाऊक असूनही नाटकांत जितकें रमायचें तितकें मी रमतों ! त्या नाटकाप्रमाणेंच मी या जीविताशीं तन्मय होऊन वागतों !

एका नामांकित मानसशास्त्रज्ञाची लेक, एका उत्कृष्ट
इतिहासकाराची पत्नी, व शिवाय स्वतः
पहिल्या प्रतीची लेखिका म्हणून प्रसिद्धि
पावलेली इटलींतील विदुषी

## गिना लॉंब्रोसो

हिचें उत्तर.

प्रिय महाशय,

आपल्या पत्राबद्दल मी फार आभारी आहे.

आपण जो प्रश्न विचारतां त्यानें इतरांप्रमाणें माझेंहि मन अनेक वेळां अस्वस्थ केलें आहे. त्यावर विचार करतां मला जें अगदीं मनःपूर्वक उत्तर द्यावेसें वाटतें तें हें, कीं **प्रीतीच्या आधारावर आणि प्रीतीच्या हेतूनेंच हें जीवित चालतें.** जीं माणसें आपल्याभोंवतीं आज वावरत आहेत त्यांची, जीं मृत्यूवश झालीं त्यांची, व जीं आपल्यामागून मोठीं व्हायचीं आहेत त्यांची—सगळ्यांची आपल्या जीविताशीं घट्ट गांठ बांधणारी एकच शक्ति आहे. प्रीति !

मला पक्कें आठवत आहे, कीं मी लहान होतें तेव्हां मला वाटे, माझ्या बाबांच्या जीविताबांचून मला निराळं जीवितच नाहीं; त्यांना सुखी ठेवण्यासाठींच माझा जन्म; ते मरतील तेव्हां मलाहि मरण आलंच पाहिजे.

माझे बाबा वारले. पण त्यानंतर माझें जीवितसर्वस्व माझ्या पतींत आणि मुलाबाळांत आहे असें मला वाटूं लागलें. मला वाटतें, आपण जगतों आणि उद्योग करतों याच्या मुळाशीं कोणाबद्दलची तरी निःस्सीम प्रीति असते. बायकामुलांबद्दलचें प्रेम, हें त्या प्रीतीचें सर्वांत स्वाभाविक स्वरूप !

मला आयुष्याचा बराच अनुभव आल्यावर मला असेंच वाटूं लागलें कीं आपल्या प्रीतीची कक्षा विस्तृत करून त्यांत शक्य तितक्या अधिक व्यक्तींचा अंतर्भाव करणें म्हणजेच मानवी जीवित सार्थकी लावणें होय !

वेगवेगळ्या जीवितांचें एकसूत्र करणारी प्रीति म्हणजे मानवी जीविताचें मर्म. मुलांबाळांवरची प्रीति सर्वांत श्रेष्ठ. ( मी असें म्हणणारच; मी स्त्री आहे. ) आणि तिच्या खालोखाल समानधर्मी इष्टमित्रांवरची प्रीति.

आपणांविषयीं आदरभाव ठेवणारी,

**गिना लॉम्ब्रोसो.**

अनेक उत्तमोत्तम ग्रंथांचे लेखक व नामांकित फ्रेंच पंडित

## अँड्रे मोर्वा

यांची भेदक विचारसरणी.

प्रिय ड्यूरंट,

मानवी जीविताच्या हेतूबद्दल व साफल्याबद्दल तुम्हीं जे प्रश्न विचारले आहेत त्यास उत्तरादाखल मी तुम्हांला एक मनोरंजक गोष्ट सांगतों. ऐका.

एकदां असें झालें, कीं पृथ्वीवरून स्फोटाच्या साहाय्यानें उड्डाण करून चंद्रलोकावर जातां येईल असें एक विमान कांहीं इंग्रज स्त्री–पुरुषांनीं तयार केलें व त्यांत बसून ती मंडळी चंद्र-लोकावर जाऊन पोंचली. त्यांना वाटलें होतें, जसें जायचें तसेंच परत येतां येईल. पण त्यांचा तो हिशेब चुकला. तेथून उड्डाण घेऊन परत येणारें विमान तयार करण्याचें त्यांनीं शिकस्तीचें प्रयत्न केले, पण व्यर्थ! पृथ्वीवरील लोकांना संदेशसुद्धां त्यांना पाठवितां येईना. अशा प्रकारें नाइलाज झाल्यावर मग ते काय करणार? राहिले झाले बिचारे चंद्रलोकावरच!

होतां होतां दहा वर्षें गेलीं. मात्र या अवधींत त्या स्त्री-पुरुषांनीं काय केलें, कीं जणूं कांहीं आपण इंग्लंडमध्येंच आहोंत अशा प्रकारें त्यांनीं आपले सारे व्यवहार चालू ठेवले. बोलणेंचालणें, रीतिरिवाज, समारंभाचे झोकनोक–सगळें इंग्लंडांतल्यासारखें! सर चार्ल्स सॉलोमन चंद्रलोकचे गव्हर्नर बनले. ते आणि त्यांची पत्नी जेवायच्या वेळचा योग्य तो पोषाख चढविल्याशिवाय कधीं जेवायला बसलीं नाहींत. इंग्लंडच्या राजाच्या वाढदिवसाच्या तारखेला बडा खाना व्हायचा, सर चार्लस यांनीं राजाच्या नांवचा

जयजयकार करून मद्याचा पहिला पेला घ्यायला सर्वांना सांगायचें, आणि "राजे दीर्घायु असोत!" असें सर्वांनीं गंभीर आवाजांत म्हणायचे! सारेजण गहिंवरून जायचे त्या प्रसंगीं!

अशा प्रकारें दोनशें वर्षें गेलीं, आणि तरीहि पृथ्वीशीं दळण-वळण सुरू करण्याची कांहीं आशा दिसेना. चंद्रलोकावरच्या सातव्या पिढींतली जी तरुण मंडळी मोठी होऊं लागली त्यांना वाटूं लागलें, लाखो मैलांच्या अंतरावर असलेल्या त्या राजावर काय म्हणून श्रद्धा ठेवायची बुवा? आमच्या भोळसट वाडवडिलांनीं त्याच्या नांवाची परंपरा मागें ठेवली खरी, पण तो तर आम्हांला डोळ्यांनीं कधीं पाहतांहि येत नाहीं, मग त्याच्याशीं बोलणेंचालणें तर लांबच राहिलें! नास्तिक व धर्मशून्य विद्यार्थी म्हणूं लागले, अहो, ग्रेटब्रिटनचा व आयर्लंडचा राजा, हिंदुस्थानचा बादशहा, आणि चंद्रलोकाचा स्वामी म्हणून ज्याचा जयजयकार चालतो त्याचा ठावठिकाणा आहे कुठें? असा राजा नाहींच मुळीं! त्याच्या अस्तित्वाच्या नुसत्या थापा मारल्या लोकांनीं आजपर्यंत! पण आतां यापुढें हा राजा आम्हीं मानणार नाहीं; अन् अर्थातच या राजाच्या नांवानें जारी राहिलेले कायदेकानू अन् पापपुण्याच्या रूढीहि तावून सुलाखून पारखून बुद्धीला पटल्या तरच आम्ही घेणार!

यावर जुन्या मताचे लोक जरा चिडखोरपणानें म्हणाले, 'आतां तुम्हां तरुणांच्या या अविचाराला काय म्हणायचं? तुम्हांला येवढं कसं समजेना, कीं राजाविषयींची श्रद्धा नष्ट झाली तर चंद्रलोका-वरच्या या जीवितांत स्वारस्य तें कोणतं राहील? ती श्रद्धा टाकलीत तर तुम्हांला शांतिसमाधान कोठून मिळेल? उद्योगासाठीं उत्साह कोठून वाटेल? संकटकालीं मनाला विसांवा कोणता राहील?—

पण या इशाऱ्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तरुणांच्या नास्तिक वादाचाच अखेर विजय झाला. साऱ्या जुन्या समजुती भराभर नष्ट झाल्या. कोणी ईश्वर मानीना, धर्मविधी कोणी करीना, पापपुण्याची वृथा भीति कोणाला वाटेना, जो तो स्वतंत्र बुद्धीनें वागूं लागला, समाजाची जुनी घडी पार विस्कळीत झालीसें दिसूं लागलें, आणि वाङ्मयाला अगदीं बहर आला! कांहीं लोकांना वाटलें, ही अनवस्था विनाशकारक तर ठरणार नाहीं? आपलें चुकत तर नाहीं?

पण त्यांत एक मोठा विचारवंत पंडित होता तो म्हणाला, 'अरे, घाबरूं नका. तुमचा मार्ग चुकत नाहीं. या जीविताचा हेतु या जीवितापलीकडे कुठें तरी असेल अशा कल्पनेनें तो शोधीत राहणंच चूक आहे. राजा राजा म्हणून ज्याची पूजाअर्चा करायची परंपरा आपल्या वाडवडिलांनीं रूढ केली तो खरोखरच अस्तित्वांत आहे का? तें कांहीं निश्चयानं सांगतां येत नाहीं. पण तें सांगतां आलं नाहीं म्हणून आपलं काय अडतं आहे? पृथ्वीचा मंद प्रकाश पडला कीं त्यानं या चंद्रलोकचे डोंगर मोठे सुंदर दिसतात हें मला स्पष्ट कळतं. आणखी अशाच कितीतरी गोष्टी मला स्पष्ट कळतात. मीं कधीं राजा पाहिला नाहीं, किंवा त्याचा शब्द माझ्या कानीं पडलेला नाहीं. तो असाच अदृश्य आणि प्रत्ययातीत सदा राहणार. त्याच्या अस्तित्वाविषयीं मी सदा साशंकच राहणार. पण माझ्याभोंवतालच्या जीविताविषयीं, प्राप्त उद्योगाविषयीं, वस्तूवस्तूंच्या आणि व्यक्तीव्यक्तींच्या सौंदर्याविषयीं, कष्टांत मिळणाऱ्या समाधानाविषयीं मी निःशंक आहे! चंद्रलोकाचं पुढचं भवितव्य काय आहे, माझा आत्मा अमर आहे कीं नाहीं, पुनर्जन्म खरा कीं खोटा, या काळज्यांचं ओझं वहात उगीच कां कण्हायचं? त्या मोठाल्या प्रश्नांच्या उलगड्या-

वांचून प्राप्त उद्योग कांहीं अडत नाहीं ना, किंवा बदलत नाहीं ना ? मग त्या **उद्योगांतच तन्मय व्हावं हीच खऱ्या समाधानाची गुरुकिल्ली नव्हे काय ?'**

ड्यूरंटसाहेब, या गोष्टींत तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें सांपडत असलीं तर पहा. किंवा वाटलें तर आणखी एक गोष्ट सांगतों. ऐका.

एक होती मोठी बाग. तिच्यांतल्या एका वाटिकेवर मुंग्यांनीं बांधलं वारूळ. त्यांची धावपळ सुरू झाली. हजारो मुंग्या वारुळाकडे जात होत्या, अन् हजारों वारुळाकडून परत जात होत्या. सगळ्यांचीच मोठी धांदल उडाली होती. त्या मुग्यांत एक तत्त्वज्ञ मुंगी होती. तिनें आपल्या संवगड्यांना थांबवलें, आणि म्हटलें,

'बायांनो, आजपर्यंत आपण अशा श्रद्धेनें वागत आलों, कीं आपल्या या वारुळापलीकडे जग नाहीं, एक कोणीतरी 'महापिपीलीका' आपल्यावर नजर ठेवून आपलं रक्षण करीत आहे, आणि तिची भक्ति व उपासना करण्यानंच आपल्या कष्टाचं सार्थक होतं. या अफाट आणि भयप्रद मैदानांतून कांटेकुटे आणि नाना कीटकांचे मुडदे तुडवीत येरझारा करायच्या अन् वारूळ बांधायचं म्हणजे कोण यातना ! त्यांत सुख तरी काय आणि सुरक्षितता तरी कोठली ? पाण्याचे लोटच्या लोट केव्हां येतील नेम नाहीं; मुंग्यांचा स्वाहाकार करणाऱ्या पक्ष्यांचे थवे येतातच; आभाळांत मोठमोठ्या मेघांची गर्दी झाली अन् गडगडाट होऊन मुसळधार पाऊस आला कीं मग तर हजारों मुंग्यांचा क्षणार्धांत निःपात ! पण या साऱ्या संकटांची क्षिति न बाळगतां आपण उद्योग चालू ठेवला ! आणि त्याचं कारण 'महापिपीलिके'वर आपण श्रद्धा ठेवली, आणि तिच्यावर साऱ्या सुखदुःखांचा भरीभार टाकला !

पण बायांनो, मोठ्या खेदाची गोष्ट अशी, कीं ही आपली सारी श्रद्धा मूर्खपणाची होती. मी या गोष्टीचा फार खोल शोध व विचार केला आहे, व त्यावरून मला जें कळलं आहे तें ऐका. आपल्याला वाटत होतं, आपलं वारूळ म्हणजे सारं ब्रह्मांड, अन महापिपीलिकेच्या साऱ्या कर्तृत्वाचा आणि दयेचा वर्षाव आपल्यावरच काय तो होतो आहे. पण तसं नाहीं. आपल्या वारुळासारखीं दुसरीं कोट्यावधि वारुळं आहेत, त्यांपैकीं प्रत्येक वारुळांत कोट्यावधि मुंग्या आहेत, अन् प्रत्येक वारुळांतल्या मुंग्यांना असाच भ्रम वाटत आहे कीं बस्, आपल्यावांचून आहे काय या जगांत ? इतकंच नाहीं. मुंग्यांची जात अब्ज-खर्वांनीं मोजली पाहिजे हें जरी खरें, तरी ही जात म्हणजे अशा दुसऱ्या असंख्य जीवकोटींपैकीं एक होय. हें ऐकून तुम्हांला कससंच वाटत असेल. पण येवढ्यानं काय झालं आहे ? कोट्यावधि जीवजातींपैकीं आपली मुंग्यांची एक जात आहे येवढंच नव्हे, तर आपली जात दुर्बळांतली दुर्बळ अन् क्षुद्रांतली क्षुद्र होय. आपला चेंदामेंदा करणारे जे मोठाले प्राणी आहेत ते आपल्याकडे तिरस्कारानं पाहून म्हणतात, 'हंः ! मुंग्या !' आणि बायांनो, या प्राण्यांचा अभिमान तरी खरा आहे म्हणतां काय ? छे, छे, छे ! त्यांचाहि अभिमान पोकळच ! तेहि क्षुद्रच ! कारण ज्या या पृथ्वीचे आपण प्रभू आहोंत असं त्यांना वाटतं ती पृथ्वी म्हणजे ब्रह्मांडाच्या पसाऱ्यांतला एक इवलासा चिखलाचा शिंतोडा, अन् त्यांचं युग म्हणजे अनंत काळाचा एक पळ.

'सारांश, आपलं हें सारं जीवित क्षणभंगुर आणि व्यर्थ आहे. म्हणून माझं तुम्हांला सांगणं, कशाला करतां ही सारी खटपट ? कशाला करायची ही नेआण वाळूच्या कणांची, अन् फुलपांखरांच्या मुडद्यांची ? कशाला करायची ही खांचखळग्यांतून धांवाधांव, अन्

काय म्हणून टाकायच्या या धापा ? या काबाडकष्टांतून निष्पन्न काय व्हायचं आहे, माती ? आपण मुंग्यांची नवी पिढी निर्माण करूं, पण तिचा काय उपयोग ? तीहि अशीच पायपिटी करील, धांपा टाकील, अन अखेर माणसांच्या खेटरांखालीं चिरडून जाईल झालं ! म्हणून माझं म्हणणं, बस् झाली ही यातायात, गुलामगिरी अन् स्वतःची फसवणूक ! कोणी महापिपीलिका आहे हाही भ्रम, आणि आपली प्रगति किंवा उन्नति होत आहे हाही भ्रम ! कशा-चीच शाश्वति नाहीं या सृष्टींत ! सारं नष्ट व्हायचं आहे, अन् संगळ्यांचेच कायमचे डोळे मिटायचे आहेत येवढीच गोष्ट खरी !—'

त्या तत्त्वज्ञ मुंगीचें हें प्रवचन आणखी किती वेळ चाललें असतें कुणास ठाऊक. पण तेवढ्यांत एक तरुण मुंगी आदबीनें पुढें होऊन म्हणाली,

" आजीबाई, तुमचं हें सांगणं ठीक आहे. पण कांहीं झालं तरी आम्ही आपलं वारूळ बांधीत राहणार येवढं खरं ! "

ड्यूरंटसाहेब, पहा या गोष्टींत तुमच्या प्रश्नाचें उत्तर तुम्हांला सांपडलें तर !

मला असें वाटतें, कीं शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीनें मनुष्य निराशाग्रस्त आणि निरुत्साही बनावा अशांतला भाग मुळींच नाहीं. सृष्टीचा पसारा अफाट आहे, आणि मानवी जीवित फार क्षुद्र आहे अशी शास्त्रांची शिकवण आहे. पण आपणांस हें ज्ञान झालें तरी त्यांत बिघडलें कुठें ? मनुष्य म्हणजे एकंदर ब्रह्मांडांतला कुठला कीटक ! बरें, असेना ? कीटकानें जगण्याची इच्छा व धडपड करूं नये असें कोणी सांगितलें ? शास्त्रीय शोधांमुळें आणि ज्ञानप्रगतीमुळें मनुष्याचा आत्मविश्वास उडाला आहे असें म्हणण्यांत

कांहींच तथ्य नाहीं. या शोधांमुळें व प्रगतीमुळें कांहीं झालें असेल तर येवढेंच कीं, आपल्या भोंवतालच्या जगाला आपल्या इच्छेप्रमाणें आणि सोयीप्रमाणें निराळें वळण देण्याची नवी ताकद माणसाच्या अंगीं आली !

तुम्ही म्हणाल, नाहीं नाहीं, शास्त्राच्या प्रगतीमुळें याहून अधिक उलथापालथ झाली आहे. जुन्या भोळ्या समजुतीच्या काळीं मनुष्यरूपी किडयांना आपण कीटक आहोंत हें माहित नव्हतें. मनुष्यत्वाच्या महतीविषयीं मोठमोठया उदात्त कल्पना होत्या. यक्षकिन्नर—देवादिकांनीं ज्यांच्या बऱ्यावाइटाची काळजी वहावी आणि ज्यांना सदाचारास प्रोत्साहन द्यावें तो मानव, अशी समजूत होती. इहलोकांत सहन कराव्या लागणाऱ्या सर्व दुःखांचा परिहार व्हावा अशी परलोकाविषयींची श्रद्धा माणसाच्या अंतःकरणांत होती. विहित कर्मांवर आणि सदाचाराच्या नियमांवर ईश्वरी मुद्रेचा अलंकार होता, आणि त्यांमुळें शोकशंकांच्या जाचांतून मानवी मनाची सुटका होत असे. आतां यांतील कोणती गोष्ट शिल्लक राहिली आहे? नव्या युगांतल्या विधिनिषेधांभोंवती परमेश्वरी संमतीचें वलय कोठें आहे?....

वाऱ्याच्या झोतानें माझ्या या खोलीच्या खिडक्यांना लावलेले पडदे हालले, आणि शुभ्र भिंतीवरच्या त्यांच्या कृष्णछाया कंप पावल्या. तें पाहून माझ्या मनांत आलें, खरेंच, कसल्यातरी नियमांवांचून माणसाला जीवित कंठतां येणार नाहीं. या संकटापासून स्वतःचें संरक्षण करण्याची उपजत बुद्धीच त्याच्या ठिकाणीं आहे. विधिनिषेधांचें व नीतिनियमांचें एक जाळें त्याच्या अंगावरून ओरबाडलें गेल्याबरोबर ती उपजत बुद्धि दुसऱ्या नव्या

जाळ्यांचें आच्छादन त्याच्याभोंवतीं विणते व त्याचें रक्षण करते. या जाळ्याला कधीं ईश्वरी आज्ञांचें स्वरूप असतें, तर कधीं शास्त्रीय सिद्धान्तांचें, तर कधीं राजानें केलेल्या कायदेकानूंचें! मिळून एकच! चंद्रलोकावरच्या सातव्या पिढींतल्या नास्तिकांप्रमाणें चिन्ह हें नुसतें चिन्ह आहे, सत्त्य नाहीं असें म्हटल्यानें बिघडतें कोठें? तेवढयानें नियमांचें वैय्यर्थ्य सिद्ध होत नाहीं कांहीं! नियमांत नेहमीं बदल होत राहतो असें ह्मटल्यानें नियमांचें अगत्य नाहींसें होत नाहीं! शेवटीं असेंच कबूल करायला नको का, कीं मानवी जीविताची आणि मानवी अनुभवाची कक्षा ओलांडण्याचा प्रयत्न करून मांडलेला कोणताहि सिद्धांत मांडला, कीं तो शंकास्पद राहणारच! आपल्याला कळत नाहीं येवढेंच आपल्याला कळतें; आणि हें कबूल केल्यानें आपला काय एवढा घातपात होणार आहे? हें साधें सत्य सॉक्रेटीसनें पूर्वींच सांगितलें नव्हतें का?

तिन्हीसांजा टळून गेल्या. तो पहा आमचा घरवाला एक आरामखुर्ची रस्त्याच्या कडेला ओढून घेऊन मजेनें बसायच्या तयारीत आहे. शेजारच्या व समोरच्या घरांघरांतून दिवे लागत आहेत. मंडळी भोजनाला बसायच्या बेतांत आहेत. मी मनाशीं म्हटलें, माझ्या शांतिसमाधानाचा खरा ठेवा कुठें आहे बरें? ज्ञानाला भिऊन दूर पळण्यांत? कां उद्योगाच्या हौसेंत?....

इतक्यांत समोरच्या छपरामागें आकाशमार्ग उजळल्यासारखा दिसला. चंद्र उगवला!"

---

## महात्मा गांधी
यांचा संदेश.

प्रिय मित्र,

तुमचें ता. ५ जून १९३१ चें पत्र पोंहोंचलें.

तुम्ही उपस्थित केलेल्या प्रश्नांचीं उतरें अशीं:—

( १ ) मानवी जिवित म्हणजे परमेश्वरी तेजाचा आविष्कार होय अशी माझी श्रद्धा असल्यामुळें तें जिवित भ्रम नसून सत्त्य आहे असें मी मानतों.

( २ ) धर्म म्हणजे ईश्वरसाक्षात्काराचें एक साधन होय असें मला वाटतें. मात्र **धर्म याचा** अर्थ **आचारनिष्ठ धर्म नव्हे.** धर्माचा अर्थ मी अत्यंत व्यापक करतों. माणसाची नीतिनिष्ठा पूर्ण कोटीस पोंचल्यावांचून ईश्वरसाक्षात्कार होणें शक्य नाहीं. म्हणून नीति व धर्म हे दोन्ही समानार्थी प्रयोग आहेत असें मी म्हणेन.

( ३ ) ध्येय साध्य करण्यासाठीं मी झगडत राहतों.

( ४ ) या झगडण्यांतच माझ्या साऱ्या स्फूर्तींचा आणि शक्तीचा उगम आहे.

( ५ ) माझा अंतिम हेतू काय तें वर सांगितलेंच आहे.

( ६ ) परमेश्वरस्वरूपांत साऱ्या जीवांचा अंतर्भाव होतो. म्हणून प्राणिमात्राची सेवा हेंच माझें समाधान. आणि हीच माझी शांति !

( ७ ) आपण अंध:कार आणि पापवृत्ति यांचा नि:पात करीत आहांत असा आत्मविश्वास हाच माझ्या सर्वसुखाचा ठेवा !

शक्य तर सवड काढून सविस्तर उत्तरें देण्याविषयीं मला आपण लिहितां. परंतु, दुर्दैवानें सध्यां सवड नाहीं, तेव्हां विस्तारपूर्वक लिहिणें अशक्य आहे.

आपला

**मो. क. गांधी.**

## टेनिसमध्यें जगाचें अजिंक्यपत्र मिळविणारी
## आदर्श अमेरिकन तरुणी
# हेलन विल्स मूडी
## हिचें उत्तर.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

तुमच्या पत्रांत तुम्ही नमूद केलेले प्रश्न मोठे गहन आहेत. अशा गहन प्रश्नांवर मत व्यक्त करतांना माझ्यासारख्या पंचविशीं-तल्या मुलीनें जरा जपूनच लिहिलें पाहिजे. जेवढें कांहीं समजून घेण्यासारखें तेवढें आपण अगदीं व्यवस्थित समजून घेतलें आहे अशी भावना म्हणजे तारुण्याचें एक लक्षण आहे. हें खरें असेल तर मला वाटतें, मी म्हातारी झालें आहे. कारण, कोणतीच गोष्ट मला पुरतेपणीं कळल्यासारखी वाटत नाहीं.

मला अगदीं हवीशी वाटते— जिच्यावांचून माझें अडेल— अशी एकच गोष्ट मला माहित आहे. ती म्हणजे माझ्या हृदयांत सदासर्वदा उसळत असलेली अस्वस्थता व धडपड! टेनिस खेळणें, चित्र काढणें— कांहीं चालेल, पण कशासाठीं तरी जिवाचा आटा-पिटा मला करतां आला पाहिजे. लहानपणीं मला कळत नसे या अस्वस्थतेचें स्वरूप, पण आतां तें कळतें. इतकीं वर्षें मी बेफाम-पणानें आणि झपाट्यानें टेनिस खेळत आलें याचें कारणही माझ्यांतली ही अस्वस्थताच! या अस्वस्थतेमुळेंच लहानपणीं शाळेंत असतांना मी भारी मनःपूर्वक अभ्यास करीत असे. शुद्धलेखनांत शंभरापैकीं शंभर मार्क मिळाले नाहींत कीं मला रडूं कोसळे. कॉलेज-मध्यें स्कॉलरशिप् मिळविण्यासाटीं माझा अटोकाट प्रयत्न असे. ती मला मिळेही. पण मिळाली नसती तर मी रडून आकांत केला असता हें खास.

आणि ही हांव माझ्या एकटीच्याच ठिकाणीं असेलसें वाटत नाहीं. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं ती आहे. **कोणत्या तरी विद्येंत, कलेंत, शारीरिक अगर बौद्धिक गुणांत पूर्णावस्था संपादन करण्याची हांव व आशा धरून धडपडत राहणें हा माणसाचा स्वभावधर्म आहे.**

**यालाच मी 'धर्म' समजतें.** जें कांहीं कार्य माझ्या हातून आजपर्यंत झालें असेल त्याच्या मुळाशीं कोणती प्रेरक शक्ति असेल तर हीच! प्रसंगानें मनावर येणारी खिन्नता, चीड अथवा राग यांचीं पटलें माझ्या आवडीचा उद्योग सारखा करायला मिळाला कीं मी दूर करूं शकतें व माझ्या जिवाला संतोष—आणि जिला पूर्ण शांति म्हणतात तीसुद्धां कां म्हणाना— लाभते.

ही अखंड अस्वस्थता, कोणत्या तरी गोष्टींत प्राविण्य व पूर्णत्व मिळविण्यासाठीं करावीशी वाटणारी ही धडपड म्हणजे सौंदर्यपिपासेचाच एक प्रकार आहे असें मला म्हणावेंसें वाटतें. सौंदर्यासक्ति आणि अस्वस्थता यांचा कांहीं तरी निकट संबंध असला पाहिजे. याबद्दल कोणत्या शब्दांनीं तुमची खात्री पटवितां येईल तें मला कळत नाहीं. इतकेंच लिहितें, कीं कलावस्तूंत प्रतीत होणाऱ्या पूर्णत्वाच्या सौंदर्याचें मी चिंतन करूं लागलें, कीं कोठल्या तरी निराळ्याच आनंदमय विश्वांत मी विहार करीत आहेसें मला वाटतें.

**परंपरागत धर्मानें घालून दिलेल्या नियमानुसार वागण्याची माझी इच्छा नाहीं हें मी सांगू शकतें. काय ते नियम? कांटेरी कुंपणांनीं बंद केलेले चौरसचौरस कोंडवाडेच जसे कांहीं!** या बाजूलाच गेलें पाहिजे! त्या बाजूनें जाल तर खबरदार! कांहीं विचारूं नका. धर्माच्या या निर्जीव सांगाड्याची

मला अगदीं शिसारी येते. निर्वेध प्रयत्न करणें, जिज्ञासेनें शोध करणें, आणि पूर्णत्वाचें सौंदर्य अमूक एका वस्तूंत आहे असें वाटल्यावर तिच्यासाठीं पराकोटीचे श्रम करणें– हा माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे. तो माझ्यापासून कोणीं हिरावून घेतला तर या जीविताचा मला वीट येईल खास !

माझ्या अंतःकरणांतल्या अस्वस्थतेला प्रगट व्हायला वाव मिळेल असा उद्योग करतां आला कीं, जीवितांत मला मोठी मौज वाटते. जीवित उत्साहानें व आनंदानें भरल्यासारखें मला वाटतें. **माझ्या धडपडींत परिणामाची फिकीर मी बाळगीत नाहीं; आणि हातांतलें काम कधीं संपूं नयेसें मला वाटतें. माझ्या मनाला त्याचा चाळा सारखा असावा अशी माझी इच्छा असते.** एकमार्गीपणानें उद्योग करणें मला आवडतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, बहुश्रुतता संपादन न करतां आंधळ्या बैलाप्रमाणें घाण्याभोंवतीं फिरावेंसें मला वाटतें. छे, छे ! सगळ्या गोष्टी थोड्या थोड्या समजाव्या आणि याव्या अशी माझ्या मनाची हौस आहेच. पण एका वेळीं कोणत्या तरी एकाच गोष्टीचा ध्यास घ्यावा, आणि आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें त्या रुळावरून क्षितिजाकडे–तत्त्वज्ञांच्या भाषेंत “ अनंत ” कां कायसें म्हणतात ना, त्याकडे–ऐन वेगानें धांवत जावें अशी माझी वृत्ति आहे !

‘ तुमच्या सुखाचा ठेवा खरोखरी कोठें आहे ? ’ असा तुमचा एक प्रश्न आहे. याबद्दल मला निश्चित उत्तर देतां येत नाहीं. पण धीर करून बोलायचेंच झालें, तर मी म्हणेन, ‘ माझ्या स्वतांत. ’ पण खरेंच, पंचवीस वर्षांच्या मुलीनें आत्मविश्वासानें असें सांगणें जरासें वेडेपणाचेंच !

मी कॉलेजांत असतांना दीड एक वर्ष तत्त्वज्ञानाचा विषय मला अभ्यासावा लागला होता. तो मीं जर आत्मसात् केला असता तर कदाचित् तुमच्या प्रश्नाचें अधिक सुसंगत उत्तर मला देतां आलें असतें. पण मी जरी त्या विषयाचीं टिपणें केलीं होती, आणि वहीवर मारे शीर्षकें उपशीर्षकें घालून आंखणी केली होती, तरी कां कोणास ठाऊक, आमची स्वारी कोरडी ठणठणीत राहिली हेंच खरें!

तेव्हां तात्त्विक सिद्धांताऐवजीं एक गोष्ट माझ्या ऐकण्यांत आहे ती येथें सांगतें. आपले सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर सन्तायानासाहेब आहेत ना, त्यांची आहे ती गोष्ट.

वसंतऋतूस प्रारंभ झाला होता. मंद वायुलहरी सुटल्या होत्या, मजेदार सूर्यप्रकाश पडला होता, आणि त्यानें मोहित झालेल्या विद्यार्थीमंडळीचें वर्गातल्या अभ्यासाकडे धड लक्ष नव्हतें. प्रोफेसर सन्तायाना आपल्या उच्चासनावर बसले होते, व पुढच्या पुस्तकांतला मजकूर वर्गाला वाचून दाखवीत होते. विद्यार्थ्यांचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें कोणी कसेतरी बसले होते, कोणी रेलून पडले होते. हलके हलके प्रो० सन्तायाना यांचा स्वतःचाच स्वर मंदावला, आणि त्यांची दृष्टि विद्यार्थ्यांच्या रांगा ओलांडून पलीकडे पोंचून खिडकीबाहेरच्या एका वृक्षावर स्थिर झाली. सुंदर, कोंवळ्या, हिरव्यागार पालवीनें तो वृक्ष फुलून गेला होता! प्रो. सन्तायानांनीं पुस्तक मिटलें व उभें राहून ते म्हणाले,

'मित्रहो, वसंतऋतु आला! पाहिलंत!....'

असें उद्गारून प्रो. सन्तायाना जे गेले ते कधीं परत आलेच नाहींत!

ही गोष्ट खरी असली तर मला बरं वाटेल. मी म्हणतें तसा एक मार्ग प्रो. सन्तायानांनीं ठरवला असेल आणि त्या एका मार्गानें

ते सारखे आनंदानें जात राहिले असतील तर छान होईल. माझी कल्पना आहे कीं, त्यांच्या अंतःकरणांत कसली तरी अस्वस्थता आहे, सौंदर्य व पूर्णत्व यांचा प्रत्यय घडवील अशी कांहीं तरी गोष्ट ते सारखे शोधीत आहेत, आणि या शोधांत व धडपडींतच हवा तो आनंद त्यांना लाभत आहे!

क्षणभर देखील निश्चल बसूं नयेसें मला वाटतें. ज्यांत सौंदर्य आणि पूर्णत्व अनुभवास येईल अशी एखादी गोष्ट साध्य करण्यासाठीं सतत धडपडावें असें मला वाटतें. मला बुद्धीची देणगी नसेना कां फारशी! कष्टाचा आनंद तर मला सदा घेतां येईल? आणि आपल्या हातून कांहींतरी विशेष पराक्रम घडेल अशी माणसानें नेहमीं आशा बाळगावी, नाहीं कां?—निदान माझ्यासारख्या तरुण धडपड्या जीवानें तरी!

ज्या इतर माणसांना तुम्हीं ही प्रश्नपत्रिका धाडली आहे तीं किती छान उत्तरें देतील! मला तसें देतां यायला पाहिजे होतें. जॉर्ज बर्नार्ड शॉ यांचें उत्तर पाहायला मिळावेसें मला फार वाटतें. कारण, स्वारी कांहींतरी विलक्षण उत्तर देणार हें खास! एकदां ते मला म्हणाले, टेनिसची खरी मजा म्हणजे गुडघा गुडघा वाढलेल्या गवताच्या कुरणांत खेळलें पाहिजे, आणि चेंडू मुळींच वापरतां कामा नये!

असलीं उत्तरें मला देतां येत नाहींत. पण वर जें लिहिलें तें अगदीं मोकळ्या मनानें आणि प्रामाणिकपणें लिहिलें आहे येवढें खास!

आपली

**हेलन विल्स मूडी.**

तत्त्वज्ञान व सामाजिक आचारविचार यांविषयीं
उद्बोधक व क्रांतिकारक मतें प्रतिपादणारे

**बर्ट्रँड रसेल**

यांचें उत्तर.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

मी सध्यां कामाच्या रगड्यापायीं इतका मेटाकुटीला आलों आहे, कीं या संसारांत कांहीं अर्थ नाहीं अशीच माझी खात्री व्हायला लागली आहे !

माणसाला या सृष्टीचें रहस्य कळून चुकल्यामुळें काय काय परिणाम घडतील असें तुह्मीं विचारतां. पण मला नाहीं वाटत हें सांगतां येईलसें. कारण माणसाला सृष्टीचें रहस्य कळून चुकलें हें तुमचें म्हणणेंच मुळीं खोटें आहे.

आपला
**बर्ट्रँड रसेल.**

---

महात्मा गांधींची थोरवी अमेरिकन लोकांस प्रथम
पटवून देणारे न्यू यॉर्कचे धर्माधिकारी

## जॉन हेनेस होम्स

यांचे विचार.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

माझ्या उद्योगांत मला उत्साह कोठून मिळतो असें तुम्हीं विचारतां. मला वाटतें, या उत्साहाचा उगम माझ्या अंतःकरणांत आणि बाहेरच्या जगांतही आहे. असत्याचरण, ढोंग, अन्याय, पाप हीं असह्य होऊन अंतःकरणांत जो तळमळीचा भडका उडतो त्यामुळें उद्योगाची स्फूर्ति होते; आणि माणसानें पराकाष्ठेची धडपड केली तर या जगाचें स्वरूप किती सुंदर करतां येईल याविषयींचें जें मोहक चित्र कल्पनेला कधीं कधीं दृग्गोचर होतें, त्याचें जबरदस्त आकर्षण घडल्यानेंही ती स्फूर्ति मिळते.

जेव्हां मला फारसा अनुभव नव्हता तेव्हां मला वाटे, कीं आपण कांहींतरी महत्कार्य केल्यावांचून मरणार नाहीं, आपल्या उपदेशानें व आचरणानें जगांत सुधारणा घडवून आणूं. पण आतां हें जग चिरकाल टिकण्याची आशा जशी वाटत नाहीं, तशाच वैयक्तिक पराक्रमाबद्दलची फारशी आशा मनांत उरलेली नाहीं. छे! ती भोळी समजूत आतां गेली. आतां हें उमजलें आहे, कीं माझ्या वैयक्तिक जीविताचा या जगावर कांहीं फारसा परिणाम होणार नाहीं. मी जन्माला आलों तसाच मृत्यु पावणार आणि जग प्रथम होतें तसेंच राहणार. आणि माझ्याप्रमाणेंच सबंध जगाचेंही आहे. तेंही जसें एके दिवशीं अस्तित्वांत आलें, तसेंच एके दिवशीं नष्ट होणार! मात्र याचा अर्थ असा नव्हे, कीं माझें

जीवित म्हणजे नुसता कचरा. तसें नाहीं. कोठल्या तरी अज्ञात व अतर्क्य समुद्राला जाऊन मिळणाऱ्या नदीप्रमाणें हा सृष्टीचा ओघ सारखा वाहत आहे, त्या प्रचंड जलाशयाचा मी एक अंश आहे, आणि एकंदर स्रोताबरोबर मीहि कोठल्या तरी अज्ञेय ध्येयाकडे चाललों आहे !

या एकंदर विश्वाच्या मुळाशीं एक प्रचण्ड सृजनशक्ति आहे, व अत्यंत अल्पांशानें कां होईना पण माझ्याही ठिकाणीं तशीच सृजनशक्ति आहे, या विचारानें माझ्या अंगीं नवशक्तीचा संचार होतो, व माझ्या उद्योगांत उत्साह वाटतो. माझ्या अंगच्या चैतन्याला भरती आल्यासारखें, सुखाच्या शिखरावर बसल्यासारखें मला माझ्या आयुष्यांत कोणकोणत्या प्रसंगीं वाटलें त्याची मी आठवण करून पाहतों, त्या वेळीं मला काय आठवतें ? तर उत्कट प्रीतीच्या अनुभवाच्या घटका, किंवा अशा आणीबाणीच्या वेळा कीं जेव्हां सर्वस्व पणाला लावून एखाद्या कार्यांत मी उडी घातली, किंवा असे क्षण कीं जेव्हां वादी संवादी सुरांच्या मधुर कल्लोळांत माझें अंतःकरण सांपडलें आणि मूळ गीतकाराच्या भावना विद्युल्लतेप्रमाणें माझ्या जिवाला चाटून गेल्या, किंवा मारीन अथवा मरेन अशा प्रतिज्ञेनें न्यायाच्या व सत्याच्या कैवारानें जेव्हां मी झगडलों त्या वेळा ! हे असले प्रसंग म्हणजे माझ्या अंगच्या सृजनशक्तीच्या प्रत्ययाचेच प्रसंग म्हणावयास नको काय ? कारण, भोंवतालच्या परिस्थितीस शिस्त लावून तिच्यांत सौंदर्य निर्माण करण्यासाठीं जो खटाटोप आपण करतों तो सृजनाचाच एक प्रकार नव्हे तर काय ?

**अपल्या वैयक्तिक जीविताची अरुंद कोंडी फोडून आपली दृष्टि ज्या ज्या क्षणीं व्यापक व उन्नत होते त्या त्या क्षणीं अशी**

पक्की खात्री वाटते, कीं विश्वाच्या उत्क्रांतीस आपलाहि हातभार अवश्य आहे, आणि या सृष्टीला अखेर जें दिव्य, सुंदर स्वरूप येणार आहे त्याचें कर्तृत्व, अल्पांशानें कां होईना पण आपल्याकडे आहे. या श्रद्धेंत माझ्या स्फूर्तीचा व उत्साहाचा उगम होतो. सृष्टीला पुढें कोणतें स्वरूप प्राप्त होणार आहे तें मला समजत नसलें, किंवा त्याची कल्पनाही करतां येत नसली म्हणून काय बिघडलें ? त्या अज्ञानाची मला लाज कां वाटावी ? महत्कार्याशीं समरस होऊन या संसारांत सतत उद्योग करण्याच्या आनंदापुढें तें अज्ञान म्हणजे प्रकाश दिसतांच नष्ट होणारा अंधार !



पियानो वाजविणाऱ्यांचे बादशहा अशी संगीतज्ञांत
ज्यांची एकमतानें तारीफ आहे त्या

## ऑसिप गेब्रिलोविश

यांची विचारसरणी.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

परदेशच्या सफरीहून परत घरीं आलों तों तुमचें पत्र हातीं आलें ! किती विस्मय व आनंद वाटला म्हणून सांगूं ! तुम्हांला वाटत असेल, तुम्हीं आपल्या पत्रांत उपस्थित केलेल्या प्रश्नाला माझ्याकडून मोठें मार्गदर्शक व आशावादी उत्तर मिळेल. पण, शपथपूर्वक सांगतों, मला तसलें उत्तर देतां येत नाहीं.

गेल्या हजारों वर्षांतील मानव जातीचा इतिहास पाहिला आणि इतक्या शतकानुशतकांनंतर माणसानें मिळविलें तरी काय याचा विचार करूं लागलें, कीं विश्वाच्या या पसाऱ्यांत कांहीं हेतु अगर पद्धति असेल असें म्हणवत नाहीं. हजारों वर्षांपूर्वी माणसाच्या स्वभावांत व कृतींत जेवढी दुष्टता आणि पापवासना भरलेली होती तेवढीच आजही दिसत आहे. प्रगट होण्याची तिची तऱ्हा बदलली आहे यापलीकडे कांहीं नाहीं. राज्यव्यवस्था, समाजव्यवस्था, पैशांचे व्यवहार, इत्यादि सर्वच गोष्टींत जी अनवस्था आज जिकडे तिकडे दिसत आहे तीवरून हीच गोष्ट स्पष्ट दिसून येते. या अनवस्थेचें खरें कारण हेंच नव्हे काय, कीं अनुभवानें शहाणपणा शिकण्याची माणसाला अक्कल तरी नाहीं किंवा इच्छा तरी नाहीं, आणि या बाबतींत मनुष्य हजार वर्षांपूर्वी होता तसाच कोरडा राहिला आहे ?

मात्र हें सारें खरें असलें तरीहि प्रेम व सौंदर्य यांच्या अस्तित्वा-बद्दल श्रद्धा वाटते; आणि असेंही वाटतें, कीं माणसाच्या अंतः-

करणांत कांहींतरी उच्च ध्येयें आहेत. खोट्या सुखाच्या नादीं लागून माणूस या ध्येयांशीं घडोघडीं बेइमानी करतो तें निराळें; पण उदात्त कल्पनांचें स्फुरण मानवी अंतःकरणांत होतें यांत संशय नाहीं. तुमचा एक प्रश्न असा आहे, कीं माझ्या सुखाचा ठेवा कोठें आहे. **तो ठेवा मला दोन ठिकाणीं दिसतो. माझी कला, आणि माझीं बायकामुलें हीं तीं दोन स्थानें होत.**

पण भावी पिढींतल्या स्त्री-पुरुषांस या सुखस्थानांचा लाभ मिळेल काय ? कारण भोंवतालीं पहावें तों जिला मी खरी कला समजतों तिची पद्धतशीरपणें गळचेपी चालली आहे व टारगट, उत्तान कलाप्रकारास ऊत आला आहे. उच्च सौंदर्याविष्कार करणें हें कलेचें प्रधान कार्य होय हेंच आजच्या नव्या पंडितांना मान्य नाहीं. हें मत बोकाळल्यास कलेचा आनंद कितीसा उरणार तें दिसतेंच आहे ! कुटुंबसंस्थेची काय दुर्दशा होत चालली आहे तें तर तुम्हींच आपल्या पत्रांत दिग्दर्शित केलें आहे व तें खरें आहे. ज्या चिरकाल टिकतीलशा वाटल्या होत्या अशा कितीतरी गोष्टींचा यंत्रयुगाच्या क्रांतीमुळें निःपात झालेला आपण प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला आहे, आणि आतां यंत्रयुगाचा उदय पौर्वात्य देशांत होत आहे तो होऊन जर का यंत्रसंस्कृति जगभर पसरली तर कुटुंबसंस्थेची धडगत नाहीं.

डयूरंटसाहेब, हें माझें उत्तर कांहीं मोठें समाधानकारक नाहीं, या उत्तरापासून तुम्हांला किंवा तुमच्या वाचकांना कांहीं बोध घेतां येईल अशांतला भाग नाहीं. कदाचित् माझ्याविषयीं गैरसमज होईल. माझा निराशावाद ऐकून लोक म्हणतील, या बेट्याचें आयुष्य दुःखांत व कष्टांत गेलेलें दिसत आहे, म्हणून बोलतो आहे हा

असें आंबट तोंड करून ! शोपेन हॉअरसारख्या बड्या तत्त्ववेत्त्यावर सुद्धां असला आरोप आला होता; मग माझ्यावर कां नाहीं येणार ? पण खरें विचाराल तर या संसाराविषयीं तक्रार करण्याचें माझ्या वैयक्तिक दृष्टीनें मला कांहींच कारण नाहीं. दैवाची माझ्यावर सतत मेहरबानीच झालेली आहे.

माझें मत असें आहे, कीं एकंदर जीविताविषयीं विचार ठरवितांना माणसानें केवळ स्वतःच्या सुखदुःखाकडे पहाण्याऐवजीं सभोंवार सगळीकडे नीट नजर टाकावी. आपणां सर्वांना डोळे असतात आणि कान असतात आणि स्वतःहून इतर शेंकडों व्यक्तींच्या जीविताचें सूक्ष्म अवलोकन करण्याची संधि परोपरीनें मिळत असते. मग आपलें वैयक्तिक भाग्य किंवा दुर्दैव तेवढेंच लक्षांत घेऊन सबंध जगाविषयीं मत बनविण्याचा वेडेपणा कां करायचा ? मला दिवसांतून तीन वेळां चमचमीत जेवायला मिळतें यावरून असें कां मी गृहित धरायचें, कीं जगांत कोठेंही कोणीही भुकेनें तळमळत नसेल ? किंवा आपली तब्येत टुमटुमीत असली तरी आज जगांत हजारों मनुष्यप्राणी शारीरिक व्याधींनी जर्जर झाले आहेत या गोष्टीकडे तुम्हांआम्हांला कानाडोळा करतां येईल काय ?

आपला

**ऑसिप गेब्रिलोविश.**

दारिद्र्यांत जन्मलेला पण आतां लक्षाधीश
झालेला अमेरिकन बोलपटांतील
नामांकित विनोदी गायक नट

## उइल रॉजर्स

याचें सरळ, साधें उत्तर.

हें जग म्हणजे नुसता गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ आहे. जो तो आरडाओरडा करून आणि शिट्या वाजवून दुसऱ्याला खालीं ओढीत असतो. तेव्हां या जगांत राहाचें म्हणजे खरें तत्त्वज्ञान असें, कीं **रोज एकदां तरी खद्खदून हंसावें, आपल्यापरी उद्योगाची शिकस्त करावी आणि कशालाच फारसें महत्त्व देऊं नये.** वेदांताच्या खोल पाण्यांत न शिरणें चांगलें; कारण शिरलें कीं माणूस व्यवहाराला नालायख आणि खुळा व्हायचा संभवच फार !

आणि हें पहा, डोळ्यापुढें ध्येय नसणेंच चांगलें. कारण, ध्येय हें मृगजलासारखें असतें. त्याच्या जवळ जावें तों तेथून तें अदृश्य होतें. परलोकावर विश्वास ठेवायला हरकत नाहीं, पण तेथें सुखाचा गड्डा आपल्यासाठीं राखून ठेवला आहे असें समजूं नये. तसें समजलें, कीं या संसारांतल्या ज्या त्या गोष्टीबद्दल माणूस रडगाणें गाऊं लागतो. **माणसानें या आयुष्यांत अशी वृत्ति ठेवावी, कीं अंगीकृत उद्योगांत अपयश आलें तरी त्यामुळें खचण्याऐवजीं पाऊल पुढें पडावें !**

---

## जन्मठेप भोगणाऱ्या एका कैद्याचें उत्तर.*

या मानवी जीविताचा हेतु काय, आणि त्यांत स्वारस्य काय असा तुमचा प्रश्न आहे. मला वाटतें, ( ज्याचें सबंध आयुष्य तुरुंगाच्या कोठडींत जायचें आहे त्याचें हें म्हणणें आहे हें लक्षांत ठेवा ! ) या जीविताचे मूलभूत नियम समजून घेण्याची माझी पात्रता आणि अनुभवानें शहाणपणा शिकण्याची माझी तत्परता यावरच जीविताचें स्वारस्य अवलंबून आहे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे असें कीं **जीवितांत स्वारस्य उत्पन्न करण्याची मी जी खटपट करीन तिच्यावरच तें स्वारस्य अवलंबून आहे.**

मोकळ्या जगांत स्वतंत्रपणें राहणाऱ्या माणसापेक्षां बंदिशाळेंत काळ कंठणाऱ्या माणसाला जीवित अधिक नीरस वाटलेंच पाहिजे असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. त्याच्या जीवितांतसुद्धां उत्साह आणि स्वारस्य असावयास हरकत नाहीं. त्यानें जें तत्त्वज्ञान मनावर ठसवून घेतलें असेल त्याच्या ओजस्वितेवर या गोष्टी अवलंबून आहेत.

माझें स्वतःचें तत्वज्ञान अगदीं साधेसुधें आहे. प्रत्येक गोष्टीचें सत्यस्वरूप माहीत करून घेण्याची इच्छा हा माझा ध्रुव-

---

* ड्यूरंटसाहेबांनी जें पत्र जगांतल्या थोर थोर स्त्रीपुरुषांस धाडलें तेंच त्यांनीं ‘ सिंग सिंग ’ येथील तुरुंगांत जन्मठेप भोगणाऱ्या ओवेन मिडल्टन नांवाच्या गृहस्थास धाडलें. तें धाडण्यांतला उद्देश अर्थातच असा, कीं ज्या माणसाला या जगांत इतिकर्तव्यता व सुखाशा उरली नाहीं, जो जिवंत असून मेल्यासारखा आहे, तो जगाकडे कोणत्या दृष्टीनें व भावनेनें पाहतो हें कळावें.

तारा होय; व तें माहित करून घेतांना जे साधेसुधे विचार मला पटतात तेवढ्यांना मी माझें तत्त्वज्ञान समजतों. माझ्या बुद्धीचा तोल मला ठेवतां आला नाहीं, कीं तर्कवितर्कांच्या व शंकाकुशंकांच्या जंजाळांत सांपडल्यासारखें मला होतें व बुद्धीचा तोल राखायचा असेल तर या जीविताकडे पहावयाचा माझा दृष्टिकोन चुकीचा असतां कामा नये असें मला वाटतें.

तुम्ही म्हणतां " ज्ञानाची प्रगति झाल्यानें माणसाचा मोठा घात झाला आहे. ज्ञान हें सुंदर नाहीं. त्यानें माणसाला सुखी केलें नाहीं. जुन्या काळच्या लोकभ्रमांतून व वचनांतून आजच्या ज्ञानयुगांतला मनुष्य मुक्त झाला आहे. पण त्या लोकभ्रमांत व बंधनांतच माणसाला सुखाची प्राप्ति होत होती. "

पण मला तुमचें हें विधान पटत नाहीं. खोट्या समजुती-वांचून व भ्रमावांचून माणसाला या संसारांत सुख व स्वारस्य वाटूं नये असा न्याय असता तर तुमचें म्हणणें खरें म्हटलें असतें. मग ज्ञानाच्या प्रगतीमुळें ते भ्रम गेले त्याबरोबर माणसाच्या समाधानाचा ठेवाही नाहींसा झाला, असें म्हणतां आलें असतें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं.

**सत्य हें तत्त्वतः सुंदरही नाहीं आणि ओंगळही नाहीं.** गणितांतल्या आंकड्यांना आपण सुंदर किंवा ओंगळ म्हणतों कां? नाहीं. आंकडे म्हणजे आंकडे! तसेंच सत्याचें आहे. सत्य म्हणजे सत्य आणि दुसरें कांहीं नाहीं!

एखाद्या व्यापाऱ्याला आपल्या धंद्याचा आढावा घ्यायचा असला म्हणजे तो कागदावर आंकडे मांडतो. पण ते मांडल्यानें धंद्यांत आपण खोट खात आहोंत असें त्याला आढळून आलें, तरी

तो कांहीं त्या आंकड्यांना शिव्याशाप देत नाहीं. किंवा ते आंकडे मांडून पडताळून पाहिल्यामुळें त्याची पूर्वींची समाधानी वृत्ति नष्ट झाली म्हणून ते आंकडे ओंगळ व अपशकुनी आहेत असेंही तो म्हणत नाहीं. सत्याचेंही असेंच नाहीं का? व्यापाऱ्याला ज्याप्रमाणें धंद्याच्या उलाढालींत यथायुक्त दृष्टि आंकड्यांच्या साहाय्यानें प्राप्त होते, तद्वतच या जीविताच्या उलाढालींत सत्याचा आपल्याला उपयोग होतो. मग आपल्या दुःखांचें खापर सत्यावर फोडण्यांत कोणता शहाणपणा आहे बरें?

आपल्या मानवी स्वभावांत मूर्तिपूजेची जी एक खोड आहे तिच्यामुळें सत्य म्हणजे कोणीतरी एक शंखचक्रगदाधारी दैवत असलें पाहिजे अशी आपण कल्पना करतों; आणि मग व्यवहारांत सत्य दिसलें व त्याच्या अंगावर राजचिन्ह नाहींसें समजलें कीं आपण ऊर बडवून आक्रोश करतों 'हाय हाय! कोण दुष्ट, असह्य फसवणूक ही!'

संवय, परंपरा आणि अंगवळणीं पडलेल्या चालीरीती, यांच्या परिणामानें आपल्याला असें वाटूं लागतें, कीं अमुक विशिष्ट सुखसोयींवांचून माणूस सुखांत असणें शक्य नाहीं. ही भावना म्हणजेच सत्यज्ञान होय असें आपण मानतों.

पण हें सत्यज्ञान नव्हे. ही एक समजूत आहे. सत्य गोष्ट ही कीं **सुख हें अंतःकरणाच्या समाधानांत आहे. हें समाधान निर्जन बेटावर, छोटेखानी गांवांत किंवा बकाली चाळींतही मिळेल. तें श्रीमंताच्या प्रासादांत सांपडेल, तसें गरिबाच्या खोपटांतही सांपडेल.**

माणूस बंदिखान्यांत पडला कीं त्याचें सुख नष्ट झालेंच पाहिजे असें म्हणतां यायचें नाहीं. तसें असतें तर जेलखान्या-

बाहेरचीं सारीं माणसें सुखीसमाधानी दिसायला हवीं होतीं. दारिद्र्यानें दुःख उद्भवतें असेंही नाहीं. तसें असतें तर सारे पैसेवाले सुखांत असायला पाहिजे होते. अशीं किती तरी माणसें असतात, कीं त्यांचीं सारी उमर एखाद्या टीचभर गांवांत गेली असूनही त्रिखंड प्रवासाची मजा करणाऱ्या मुशाफरांइतकींच तीं आनंदांत असतात. एकदां एक अगदीं निरस निरक्षर म्हातारा नीग्रो माझ्या पाहण्यांत आला. तो एका विद्वान प्रोफेसरच्या घरीं नोकरीला होता. स्वारी आपल्या पांडित्यपारंगत धन्यापेक्षां अधिक आनंदानें मस्त असे. हिंदू सुखांत असूं शकतात, चिनी सुखांत असूं शकतात, स्पेनमधले लोक, तुर्कस्थानांतले लोक! उत्तरेस दक्षिणेस, चारी दिशांना सुखी लोक आपल्या आढळण्यांत येतील. असे कित्येक कीर्तिवंत स्त्री-पुरुष आहे कीं जे सुखांत आहेत; आणि अशीं असंख्या सुखी माणसें आहेत कीं ज्यांचें नांव शेजाऱ्याला देखील माहित नाहीं!

सुख धर्मावर अवलंबून नाहीं, देशावर अवलंबून नाहीं, पैशावरही नाहीं, आणि पदवीवरही नाहीं!

मग सुख ही चीज आहे तरी कोणत्या स्वरूपाची? आणि सुखाचा ठेवा आहे तरी कोठें?—

नीट विचार केल्यास असें दिसून येतें, कीं **सुख म्हणजे अंतःकरणाच्या समाधानाचा एक प्रकार आहे. अर्थात् तें बाहेर जगांत अमुक ठिकाणीं नसून ज्याच्या त्याच्या जवळच आहे.** मग तें माणसाला कोणत्याही अवस्थेंत— जेलखान्यांत सुद्धां!— लाभण्यासारखें आहे असें म्हणायला कोणती हरकत आहे?

कांहीं विद्वानांचें म्हणणें असें, कीं अलीकडच्या नव्या नव्या शोधांनीं व सिद्धांतांनीं हें उघड झालें आहें, कीं मानवी जीविताची

कांहीं एक मातबरी नाही– सारी मानव जाती अखेर दुबळी ठरून विस्मृतीच्या खाईंत गडप व्हायची आहे, तेंव्हां माणसानें हें करूं तें करूं नये अशी धडपड तरी कशाला करायची?

पण नव्या शास्त्रसिद्धांताचा असा निष्कर्ष निघतो, असें म्हणावयास मी तयार नाहीं. उत्क्रांति हाच प्रगतीचा सर्वोत्कृष्ट प्रकार होय. या जगाची उत्क्रांति होत आहे ही गोष्ट इतिहासावरून स्पष्ट दिसत आहे. या उत्क्रांतींत नवी नवी परिस्थिति पुनःपुनः उद्‌भवत असते. परिस्थितिभेदाप्रमाणें आपल्या जीवनप्रकारांत पालट करण्याची ताकद ज्या प्राण्यांच्या ठिकाणीं नव्हती ते पार नष्ट झाले, व यापुढेंही हाच न्याय चालावयाचा आहे. मनुष्याजवळ तर्कबुद्धि व शोधकता अशीं जीं दोन हत्यारें आहेत त्यांच्या साहाय्यानें परिस्थितिभेदानुसार तो आपलें अनुसंधान बदलूं शकतो. जगाच्या उत्क्रांतीच्या रगाड्यांत माणसाचा निभाव लागायचा असेल तर तो त्याच्या शोधकशक्तीमुळेंच लागेल!

जों जों शास्त्रांचा अभ्यास करावा, नव्या नव्या शोधांकडे दृष्टि टाकावी, आणि मनाशीं साऱ्या गोष्टींचें मनन करावें, तों तों जग हें सुसूत्र आणि सुव्यवस्थित आहे अशी माझी खात्री पटते. जग हें आंधळेपणानें अंधेरांत कुठेंतरी भडकत चाललें आहे असें माणसाला वाटतें याचें कारण माणूस प्रथम आंधळेपणा व डोळसपणा याच्या विशिष्ट कृत्रिम व्याख्या गृहित धरून विचार करतो हेंच. अंधार व अनवस्था कोठें असेल तर ती जगाच्या स्वरूपांत नसून माणसाच्या बुद्धींतच असली पाहिजे!

जीविताची पीछेहाट होणें शक्यच नाहीं. अर्थात् माणसाचीहि नाहीं.

या सृष्टींत प्रथम चैतन्ययुक्त जीव नव्हते, व त्यांचा उदय केवळ योगायोगें झाला, असें शास्त्रज्ञांचें जें एक मत आहे तें मला मान्य आहे. परंतु, जिविताचा उद्भव कां झाला हें सांगतां येत नाहीं, येवढ्यावरून जीविताला कांहीं अर्थच नाहीं असें कसें म्हणतां येईल? तसें म्हणणाऱ्यांचें माप छोट्याशा तर्कवादानें त्यांच्या पदरांत टाकणें अवघड नाहीं. कसें तें पहा. अध्ययन व मनन करून जीवित निरर्थक आहे असें सार काढणारीं माणसें हुशार म्हटलीं पाहिजेत हें तर खरें ना? जी गोष्ट निरर्थक आहे ती हुशार मनुष्य करीत राहणार नाहीं व या न्यायानें पाहतां हें जीवित जर खरोखरच निरर्थक असतें तर या हुशार माणसांनीं आपल्या जीविताचा केव्हांच अंत करून टाकला असता! तसें तीं करीत नाहींत त्याअर्थीं जीवितांत अर्थ व स्वारस्य आहे यांत संशय नाहीं. जीवितांत अर्थ नाहीं असें तीं माणसें तोंडानें म्हणतात, पण त्यांच्या मनाची तशी खात्री नसते. अमक्यानें आत्महत्त्या केली असें जेव्हां जेव्हां मी वर्तमानपत्रांत वाचतों तेव्हां तेव्हां माझ्या मनांत येतें, 'जीवितांत अर्थ नाहीं असें या गृहस्थाला मात्र मनःपूर्वक वाटलें असलें पाहिजे खरें!'

आधुनिक कालांतील यंत्रांची वाढ पाहून कांहीं लोक घाबरून जातात, व या यंत्रांमुळें मनुष्यजातीचा नाश होणार असें ओरडत सुटतात. पण त्यांनीं असा विचार करावयास पाहिजे, कीं माणूस प्राचीन काळीं आपले हातपाय वापरून काम करूं लागला तेव्हां तोसुद्धां आजच्या यंत्राप्रमाणें कृत्रिम साधनें उपयोगांत आणण्याचाच एक प्रकार झाला. परिस्थितीशीं टक्कर देऊन मार्ग काढण्यासाठीं माणूस धडपडत होता, व स्वतःचे हातपाय हीं ओबडधोबड साधनें त्याला पुरेशीं वाटलीं. आजचीं यंत्रें म्हणजे तरी जीवनकलहांत उपयुक्त व आवश्यक ठरणारीं साधनेंच होत. त्यांज-

कडून अधिक वेगानें व अधिक सफाईनें कामें होतात येवढाच काय तो फरक. परीस्थित्यनुरूप माणसाची रहाणी जशी बदलली त्याचप्रमाणें त्याची विचारसरणी, संवयी इतकेंच नव्हे तर कदाचित् त्याच्या शरिराचा आकारसुद्धां बदलणारच हें उघड आहे.

जीवकोटी प्रथम जलचर होती. हळूहळू तिला पाय फुटले व ती जमिनीवर सरपटूं लागली. पुढें तिची आणखी उत्क्रांति होऊन ती डोंगरपठारावर हिंडूं फिरूं लागली. तोच क्रम पुढें चालू राहणार, व मनुष्य अंतरिक्षांत स्वैरसंचार करूं लागणार! हें सारें व्हायचें तसेंच होत आहे.

आज संध्याकाळीं मी इतर कैद्यांबरोबर आमच्या या जेलखान्याच्या आवारांत उभा होतों त्या वेळीं आभाळांतून ' घूं ऊं ऊं....' असा गंभीर ध्वनि ऐकूं आला. आम्हीं सर्वांनीं वर पाहिलें तों ' लॉस अँजेलिस ' नांवाचें प्रख्यात प्रचण्ड विमान आमच्या माथ्यावरून मोठ्या दिमाखांत तरंगत चाललें होतें. तें दृश्य पाहतांच माझ्या मनांत आलें, जीविताच्या उत्क्रांतीची आणखी साक्ष कोणती हवी? आणि जीवकोटी जशी पाण्यांतून पृथ्वीवर व पृथ्वीवरून आकाशांत संचारूं लागली तशी भावी काळांत केव्हांतरी ती अंतरिक्षाच्याहि पलीकडे सूर्यमंडलाचा भेद करून विहार करूं लागेल, नवें नवें ज्ञान संपादन करील, आणि प्राचीन रानटी माणसापेक्षां आजचा मनुष्य जसा अधिक बलिष्ठ व कार्यक्षम तसाच आजच्या माणसाहून तो भावी मनुष्य प्राणी अनेक पटींनीं अधिक पराक्रमी असेल, याबद्दल तरी संशयाला जागा कोठें आहे?

सृष्टीच्या उत्क्रांतीचें अंतिम स्वरुप काय असेल—या जगाचें अखेर काय व्हावयाचें आहे तें मला माहित नाहीं. माहित

असावेंसेंहि मला फारसें वाटत नाहीं. जगाच्या अंताची चर्चा मला हवी कशाला ? जगाचा अंत व्हायच्या आधीं माझा अंत होणार हें खास. आपली नक्कल म्हणून अंतर्धान पावणाऱ्या नटाप्रमाणें आपलें काम करून मी लुप्त होणार ! **जें काम वांट्याला आलें तें चोख वठवायचें येवढीच त्या नटाप्रमाणें माझी ईर्षा !**

रोगराई, आधिव्याधी, बंदिवास, काय वाटेल तें झालें तरी माझी जी भूमिका ठरली आहे ती कशानेंही हिरावली जाणार नाहीं अशी माझी श्रद्धा आहे. मानवी जीवित नांवाची जी प्रचण्ड, विस्मयजनक गति सारखी वरवर चाललेली आहे तिचा मी एक अविभाज्य अंश आहे अशी माझी श्रद्धा आहे. या श्रद्धेंत माझें समाधान, माझी शांती, स्फूर्ति, सुखाचा ठेवा आहे !

— —

उत्तर ध्रुवासारख्या भयप्रद अज्ञात प्रदेशांवर मोहीम करणारे

## विल्हजाल्मूर स्टेफॅन्सन

यांची स्पष्टोक्ति.

प्रिय ड्यूरंट,

तुम्हांला माझीं खाजगी मतें माझ्या तोंडून वदावयचीं आहेत असें दिसतें.

'संसारांत धर्माचा आधार मला कितपत वाटतो?' असा तुमचा एक प्रश्न आहे. हार्वर्ड शहरीं धर्मशास्त्राचा मी अभ्यास करीत होतों. त्या दिवसापासून मीं या प्रश्नाचा पुष्कळ विचार केला आहे. पण या विचारापेक्षां अनुभवजन्य शहाणपणाचेंच महत्व मी अधिक मानतों. मीं असें पाहिलें आहे, कीं आस्तिकांना वाटतें आपण नास्तिकांपेक्षां अधिक सुखी आहोंत व नास्तिकांना वाटतें आपण आस्तिकांपेक्षां अधिक समाधानांत आहोंत. दोघांपैकीं खरें कोणाचें तें मला सांगतां येत नाहीं. पण स्वतःपुरतें सांगायचें झाल्यास, **माझ्या दुःखाचें परिमार्जन करण्यासाठीं म्हणून धर्म किंवा मद्य यांपैकीं कशाचाच आश्रय मीं कधींहि केलेला नाहीं!**

'मी जगतों कशाच्या जोरावर'? मला वाटतें मी अन्न खातों म्हणून जगतों. अन्नापेक्षां 'जळण' हा शब्द बरा. कारण, आपण सारीं माणसें म्हणजे उष्णतेवर चालणारीं एंजिनें आहोंत. जितकें व ज्या प्रकारचें जळण मिळेल त्याप्रमाणें एंजिन चालतें, व त्याचा एखादा भाग मोडला कीं तें बंद पडतें. माणसाचेंही असेंच आहे.

तुम्हीं विचारतां, माझ्या उद्योगांत मला स्फूर्ति देणारी गोष्ट कोणती? मी पुन्हा म्हणतों, अन्न. दोन वर्षांपूर्वीं मी दहाबारा महिने

केवळ मांस व पाणी यांवर राहिलों होतों. मिश्र आहारावर मी नेहमीं राहतों. त्या दहाबारा महिन्यांत नेहमींपेक्षां माझी वृत्ति कितीतरी अधिक आनंदी होती. उद्यां हें करायचें, पुढच्या वर्षी तें करायचें असा विलक्षण उल्हास माझ्या अंगीं आलेला मला दिसला. उल्हासाचें खरें उगमस्थान अन्न होय. त्याच्या खालो-खाल महत्वाच्या गोष्टी म्हणजे हवा आणि झोंप!

पण तुम्ही वेदांती आहांत, तुम्ही म्हणाल जड तत्त्वांचीं नांवें घेऊं नका. आध्यात्मिक तत्त्वें सांगा. तींहि मला सांगतां येतील. त्यांतील मुख्य म्हणजे, **माणसानें ज्यासाठीं प्राणाहुति द्यावी असें कांहीं असेल तर ज्ञानाचा प्रसार, ही भावना! या भावनेमुळें माझ्या शक्तीप्रमाणें तोच उद्योग मी करतों.**

विश्वविद्यालयांत जी विद्या मी संपादन केली, व आतां वर्त-मानपत्रांच्या साहाय्यानें जें ज्ञान मी मिळवीत आहें, त्यामुळें सुखी होण्याऐवजीं मीं निराशच होणें अधिक संभवनीय आहे असें तुम्ही कां म्हणतां कळत नाहीं! या जीविताचा अंतिम हेतु व अर्थ अजून कोणाला कळला नाहीं येवढेंच ना तुमचें म्हणणें? नसेल कळला! पण या जीवितांत कांहीं एक अर्थ नाहीं असें तरी कोणीं कधीं अजून बिनतोड सिध्द केलें आहे?

निरर्थक कांहीं असलेंच तर 'जीवितांत कांहीं अर्थ आहे का?' हा तुमचा प्रश्नच निरर्थक आहे.

— —

नोबेल प्राइझ मिळविणारे जगविख्यात
हिंदी शास्त्रसंशोधक

## सी. व्ही. रमण

यांचा संदेश.

क्षणभर सुखासाठीं किंवा आशेच्या पूर्ततेसाठीं मानवजन्म आपल्या वांट्याला आला आहे असें मी कधींच मानलेलें नाहीं. या विश्वाचें गूढ उकलण्याच्या बाबतींत माणसाचें मन सदा दुबळेंच ठरेल. पण तें उकलण्याची धडपड करण्यांत केवढी तरी गंमत आहे व तेवढेंच सुख माणसाला मिळायचें असलें तरी तें काय थोडें झालें ? आजपर्यंत मी जें कांहीं केलें त्याच्या मुळाशीं बुद्धि-विलासाचा व संशोधनाचाच हेतु मुख्यत्वेंकरून होता. **धार्मिक विधींना अगर शास्त्रवचनांना मी कधींच महत्व दिलेलें नाहीं.** तथापि ख्रिस्त अगर बुद्धासारख्या महात्म्यांनीं ज्या गोष्टींचा उपदेश केला त्या वाच्यार्थानें न घेतां परमार्थानें घेतल्यास कल्याणकारक ठरतील व त्यांची ही योग्यता त्रिकालबाधित आहे असें मी मानतों. **स्वतः झटून उद्योग करावा, कांहीं तरी विशेष पराक्रम करावा, आणि असाच पराक्रम व उद्योग करण्यास इतरांना मदत करावी, अशी जी अनिवार इच्छा माझ्या अंतःकरणांत आहे तीच माझी खरी स्फूर्ति !** सुखविलास उपभोगण्यापेक्षां आत्म-संयमन केल्यानेंच मला खरें सुख मिळाल्यासारखें वाटतें. नीट विचार केला तर कोणाचीहि खात्री पटेल, कीं सबंध जगावर विजय मिळविण्यापेक्षांहि आपला स्वभाव जिंकण्यांतच खरी थोरवी आहे !

आपला,

**सी. व्ही. रमण.**

माउंट होलिओक कॉलेज नांवाच्या अमेरिकेंतील सर्वांत
नामांकित स्त्रीशिक्षणसंस्थेची सूत्रधात्री

## मेरी ई. वूली

### हिचे विचार.

दिवसेंदिवस जीविताच्या सार्थतेबद्दल माझी अधिकाधिक खात्री पटत आहे. इतकेंच नव्हे तर जीवितांत अधिक आनंदही माझ्या अनुभवास येत आहे. मी लहान होतें तेव्हां अनेक प्रसंगीं मी खिन्न व उदास होऊन बसे; पण आतां तशी विषण्ण मनःस्थिति फारशी होत नाहीं. याचें कारण माझी धर्मपरायणता. **मात्र धर्म म्हणजे ब्रह्मविद्या असें मी समजत नाहीं.** माझें धर्मशास्त्र सरळ, धोपट-मार्गी आहे. येशू ख्रिस्ताचें चरित्र म्हणजे प्रेमतत्त्वाचा अत्यंत उच्च आविष्कार होय, व मनुष्यजन्म प्रत्येकानें कसा घालवावा याविषयींच्या उपदेशाची तें चरित्र म्हणजे अखंड तेवणारी ज्योत व स्फूर्तीची खाण आहे, असें मी समजतें.

येशू ख्रिस्तासारखेच इतर जे महान् स्त्रीपुरुष होऊन गेले, व जे आपल्यांतही आज वावरताहेत, त्यांचीं चरित्रें नजरेसमोर आणतांच उद्योगाची हौस माझ्या ठिकाणीं वाढते. त्या चरित्रांवरून मानवी जीवित किती पराक्रमपूर्ण व सुंदर होऊं शकतें हें स्पष्ट दिसतें, व तें दिसल्याबरोबर अंगांत नव्या उल्हासाचा संचार झाल्यावांचून रहात नाहीं. माझे वडील व माझी आई यांच्या उच्च चरित्राचाही माझ्यावर असाच परिणाम झाला आहे.

माझ्या अध्यापनाच्या व्यवसायामुळें अनेक मानवी जीवांच्या अंगचे सुप्त गुण प्रगट होण्यास मदत करण्याची मला संधि मिळते, व मला माझ्या उद्योगांत सदा उल्हासित ठेवणाऱ्या गोष्टींत या

संधीचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. माझ्याप्रमाणें वर्षानुवर्षें कोंवळ्या, निष्पाप, कार्यतत्पर, आनंदी जीवांचा सहवास घडल्यावर कोणी मनुष्य निराशावादी कसा राहील तें मला कळत नाहीं! माझ्या डोळ्यांदेखत किती तरी मुग्ध, लहानगे जीव वाढत वाढत सुंदर व पराक्रमी बनले आहेत!

**सुख कशांत मिळतें? तें अमक्याच कृत्यानें आणि अमक्याच वेळीं मिळतें असें नाहीं. उद्योगाहून निराळें असें तें नाहींच! जगणें व अविश्रांत कष्ट करणें म्हणजेच सुख!** मी हें पत्र लिहीत आहे ती सकाळची वेळ आहे. सुंदर उन्हें पडलीं आहेत, व शरद् ऋतूची निसर्गशोभा जिकडे तिकडे पसरली आहे! **अशा वेळीं जिवंत असण्याहून सुख आणखी निराळें तें कशासाठीं शोधायचें?**

**मेरी ई. वूली.**

---

अनेक उत्कृष्ट चित्रपटांचा डायरेक्टर

## कार्ल लाएमल्

याची विचारसरणी.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

तुमचें पत्र फारच मनोरंजक आहे. तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें मी खुशीनें देईन; पण त्यांनीं तुमचें समाधान कितपत होईल तें तुमचें तुम्ही पहा. कारण मला जें अंतःकरणापासून वाटतें तेंच मी सांगणार असलों तरी एखादा फोटो अस्पष्ट उठावा तशीं माझीं उत्तरें वाटण्याचा संभव आहे. निदान तुमच्यासारख्या विद्वानाला तरी !

शास्त्रें व तत्त्वचर्चा यांच्या प्रगतीमुळें मनुष्याची जी अनुकंपनीय स्थिति झाल्याचें तुम्हीं आपल्या पत्रांत वर्णिलें आहे ती खरोखरच झाली असली, तर अतिविचार कांहीं मोठा हितावह दिसत नाहीं ! माझा स्वतःचाही अनुभवही असाच आहे, कीं **अतिविचार करणारीं माणसें जरा खुळींच होतात.**

मला सुख कशांत मिळतें असा तुमचा प्रश्न आहे. माझ्या उत्तराला हंसाल, पण खरेंच सांगतों, **माझें सारें सुख माझ्या उद्योगांत आहे !** मनांतल्या नाना कल्पनांस चित्ररूपानें व ध्वनिरूपानें मूर्तस्वरूप देण्याचा माझा धंदा आहे. आपल्या अमूर्त कल्पनांस दृश्य व श्राव्य रूप आलेलें दिसलें कीं काय मजा वाटतो तें पुसूं नका ! पुष्कळदां माझी धडपड वायांहि जाते, पण त्यानें यशाच्या आनंदावर विरजण पडत नाहीं. अगदीं खुल्या दिलानें लिहायचें ठरविलें आहें तेव्हां सांगून टाकतों कीं, हातीं सत्ता असली, आणि उद्योगांतून पैसाहि निघत असला कीं बरें वाटतें. मात्र या दोन अनुषंगिक गोष्टींवांचून माझें अडायचें नाहीं.

धडपड, आणि आपण कांहींतरी विशेष गोष्ट करून दाखवीत आहोंत ही जाणीव यांतच माझ्या जीविताचें सार्थक आहे. मी डोळयांनीं अधू व कानांनीं बहिरा असल्यामुळें मला मैदानी खेळ खेळतां येत नाहींत. निवडक मित्रांबरोबर पत्त्यांचा डाव खेळावा, किंवा शर्यतीच्या घोड्यावर लहानशी रक्कम खेळावी, याच माझ्य करमणुकी !

धार्मिक भावनींचें साहाय्य मला कितपत होतें हें मला सांगतां येईलसें वाटत नाहीं. मला न कळत तें बहुधा होत असावें. जो मार्ग मी माझ्यासाठीं आंखतों त्याची निश्चिति करण्यांत तर त्या भावनांचें अंग खचित असेल. माझ्या अंगांत जो जोम आहे त्याचा उगम बहुतकरून त्या भावनांतूनच झाला असावा. असें म्हणण्यास नक्की आधार काय विचाराल तर सांगतां येणार नाहीं. एकदां मीं अगदीं मरणोन्मुख पडलों, व कोठल्यातरी दिव्य शक्तीच्या सूत्रानें उठलों तेव्हांपासून असें वाटतें इतकेंच.

**माझ्या समाधानाचें व विसाव्याचें स्थान कोणतें म्हणाल तर माझीं मुलेंबाळें, नात्यागोत्याचीं माणसें, आणि स्नेहीसोबती !** जिवाचा आटापिटा आणि काबाडकष्ट करून मला काय मिळवायचें आहे विचाराल, तर माझीं मुलें व त्या मुलांचीं मुलें नीटपणें वाढावीं व सुखांत असावीं हें समाधान !

तुम्ही म्हणतां, 'माणसाला जगाचें सत्य स्वरूप कळलें हाच सर्वांत मोठा घात झाला.' पण काय हो ड्यूरंटसाहेब, आम्हांला बनवायसाठीं तर नाहीं ना तुम्हीं असें लिहिलें? **केव्हां कळलें माणसाला या जगाचें सत्य स्वरूप?** तसें झाल्याचें वृत्तपत्रांनीं जाड टाइपांत मथळे घालून प्रसिद्ध केलेलें मीं तर कांहीं कधीं वाचलें नाहीं बुवा! प्रत्येक शास्त्रज्ञाला वाटत असतें, आपल्याला जें सांप-

डलें तेंच सत्य. **वस्तुतः सत्य सांपडलेलें नसतें कोणालाच!** आणि त्यामुळें सत्याचा शोध लागला (!) तरी दुःख आणि परवशता संपण्याऐवजीं उलट वाढलेलीच दिसते !

जन्मभर जिवापाड कष्ट करूनही, आपत्तींमागून आपत्ति येऊन गेल्या तरी, यशापयशांनीं पाठशिवणीचा खेळ केलेला अनुभवावा लागला तरीही माझी वृत्ति आनंदीच राहिली आहे हें मीं माझें मोठें भाग्य समजतों. मी कोणत्या ध्येयाच्या मार्गानें चाललों आहे तें नीट सांगतां यायचें नाहीं. तें सांगण्याचा वर जो कांहीं प्रयत्न केला आहे तो शिकस्तीचा. पण असें आपलें वाटतें, कीं कसल्यातरी ध्येयाची मनोमय जाणीव मला नसती तर माझी आनंदी वृत्ति टिकली आहे तशी टिकली नसती !

**ज्ञान हवें का उद्योग हवा असें कोणी मला विचारलें, तर मी चटकन् म्हणेन, मला आपला चोवीस तास पुरून उरेल असा उद्योगच हवा!** ज्ञान घेऊन करायचें काय? निराशेचे सुस्कारे टाकीत आंबट तोंड करूनच बसायचें ना?

आपला,

**कार्ल लाएमल्.**

---

शिक्षणक्षेत्रांत असामान्य लौकिक मिळवणारे

डार्टमाऊथ कॉलेजचे अध्यक्ष

## अर्नेस्ट एम्. हॉपकिन्स

यांचें मत.

प्रिय ड्यूरंटसाहेब,

मीं तुमचें पत्र काळजीपूर्वक वाचलें असून तुम्हीं उपस्थित केलेल्या प्रश्नांवर विचारहि पुष्कळ केला आहे. सध्यां कॉलेजच्या कामाचा भर असल्यामुळें माझ्या मतांची पुरती फोड करून लिहिण्या-इतकी मला सवड नाहीं. म्हणून तीं थोडक्यांत सांगतां आलीं तर पाहातों.

**आम्हांला या जगांत वावरायला मिळतें हेंच मी या जिविताचें मोठें मोल समजतों.** आजच्यासारखी विलक्षण बहारीची सृष्टिशोभा एखादे वेळीं तरी ज्याला पहायला मिळते त्याला या जीविताच्या महतीबद्दल शंका येणें शक्य तरी कसें आहे तें मला कळत नाहीं. हें निळें जांभळें अफाट नभोवितान! मऊ मऊ कापसाच्या ढिगांसारखे दिसणारे व हलके हलके सरकणारे हे ढग! झाडाझुडपांवर व कुरणांवर शोभणारी हिरव्या पल्लवांची व पाल्यांची ही उधळपट्टी! उपवनांत जिकडे तिकडे दिसणारे अनंत रंगाचे हे शिडकावे! विविध पक्ष्यांच्या नाजूक कंठांतून निघणारे हे मोहक सूर! या अनुभवांची किंमत कधीं कोणाला ठरवितां येईल? सीधा विचार करणारा कोणीही मनुष्य असेंच म्हणेल, कीं ज्या अर्थीं असले अनुभव घ्यावयाची संधि या जीवितांत आपल्याला मिळते त्याअर्थीं हें जीवित म्हणजे एक मोठी पर्वणी होय! सारंगीचा सूर, किंवा

कोकिळेचा ‘ कुऊ ’ शब्द ऐकतांच जें सुख होतें त्याची उपपत्ती लावण्याचें सामर्थ्य शास्त्रांत अगर शब्दकोशांत नाहीं. पण त्या सुखाचें स्वरूप उलगडून सांगतां येत नाहीं व ठरवितांहि येत नाहीं म्हणून त्या सुखाचें सत्यत्त्व थोडेंच कमी होतें ? म्हणून माझ्यापुरतें मी असेंच म्हणेन, कीं ज्या या जीवितामुळें विविध इंद्रियसंवेदना, विकार, विचार व प्रत्यक्ष कृतीचा अनुभव घेण्याची पात्रता अंगीं येते तें हें जीवित म्हणजे एक मोठा वरप्रसाद होय ! त्यापुढें दुःखाचीहि—कांहीं दुःखें वांट्याला आल्यावांचून गत्यंतरच नसेल तर—मला क्षिति वाटत नाहीं !

आपल्या या आधुनिक ज्ञानयुगांत माणसाची अशी भ्रामक समजूत झालेली दिसते कीं ज्ञान हें केवळ साधन नसून साध्यच आहे. जीवित सर्वांगपरिपूर्ण करावयाचें असेल तर ज्ञानावांचून दुसरा मार्ग नाहीं हें खरें, पण मार्ग आणि मुक्काम हीं एक नसतात ! शास्त्र व तत्वज्ञान फोल ठरतें याचें कारण त्याला आपण केवळ तर्काच्या कसरतीची कळा आणतों ! वास्तविक पाहतां शब्द म्हणजे अंतर्यामींच्या भावना दर्शविण्याचीं चिन्हें ! तींसुद्धां अपुरीं चिन्हें ! पण आपण त्या शब्दांचेंच वृथा स्तोम माजवितों आणि मग ज्ञानांतून सुखाऐवजीं दुःख, आणि उल्हासाऐवजीं निराशा व वैताग उद्‌भवतात !

ज्ञानाची प्रगति साधण्याच्या भरांत प्रत्यक्ष मानवी स्वभावाकडे आणि अनुभवाकडे आमचें दुर्लक्ष होतें, व मग वाटूं लागतें ज्ञानांत कांही कुवत नाहीं ! खरें पाहतां ज्ञानाची गोळाबेरीज अनुभवानें पुनःपुन्हा पडताळून पाहिली पाहिजे. पण हें अवधान आपण ठेवलें नाहीं. **ज्ञान व उद्योग हीं एकमेकापासून विभक्त**

**ठेवून एकेकाची स्वतंत्र वाढ परमावधीला पोंचविली तर ती निष्फळ ठरल्यावांचून रहाणार नाहीं,** असें प्लेटोनें मागेंच सांगितलें नाहीं काय? प्लेटो म्हणाला, 'केवळ ज्ञानांत अगर केवळ उद्योगांत गढून जाणाऱ्या लोकांना दूर सारून ज्यांना ज्ञान व उद्योग यांचा सुंदर मिलाफ करतां येतो अशांच्या हातीं अधिकार-सूत्रें दिलीं तरच समाज सुखी होईल, आणि अंधार नाहींसा होऊन दशदिशांना प्रकाश फांकेल!'

आपला

**अर्नेस्ट एम्. हॉपकिन्स.**

———

“ या जीवितांत कांहीं अर्थ आहे काय ? ”
हा प्रश्न उपस्थित करणारे सुविख्यात
अमेरिकन तत्त्वज्ञ, लेखक व
हिंदुस्थानचे कैवारी

## विल ड्यूरंट

यांचे स्वतःचे विचार.

प्रिय अज्ञात मित्रा, *

तूं आपल्या आत्महत्त्येचा विचार मला कळविलास तो समजला. असा बेत करण्याचीं जीं कारणें तूं लिहिलीस तीं सकृद्दर्शनीं विचारार्ह वाटल्यावांचून रहात नाहींत. एखाद्या माणसानें स्वतःचा प्राण घेण्याचें ठरवावें ही गोष्टच या जीविताचें वैयर्थ्य ठरविण्यास पुरेशी आहे. तो मनुष्य क्षुद्रांतला क्षुद्र असला म्हणून काय झालें ? मानवी जीविताकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहूं इच्छिणाऱ्या सूज्ञाचे त्या गोष्टीकडे लक्ष वेधल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या अमेरिकेंत आत्महत्त्येचें प्रमाण वाढत आहे. गेल्या पंचवीस

---

* १९३० सालीं आत्महत्या करावयास प्रवृत्त झालेल्या अनेक लोकांनीं विल ड्यूरंट यांस पत्र लिहून विचारलें, कीं जगण्यांत आम्हांला कांहीं अर्थ वाटत नाहीं, तुम्ही मोठे विद्वान् आहांत तेव्हां सांगा. या लोकांस ड्यूरंट यांनीं जीं उत्तरें धाडलीं त्यांत त्यांनीं जीवितांत पुष्कळ स्वारस्य आहे, त्याचा कंटाळा करून आत्मघात पतकरणें वेडेपणाचें होय असें निरनिराळ्या प्रकारें प्रतिपादलें होतें. या पत्रांत ग्रथित केलेले विचार साररूपानें एकत्र करून ड्यूरंट यानीं हें पत्र “ On the Meaning of Life ” या पुस्तकाच्या शेवटीं दिलें आहे.

वर्षांत जवळ जवळ तीन लक्ष लोकांनीं आत्महत्या केल्याची नोंद आहे. प्रत्यहीं घडणाऱ्या या आत्मघाताकडे पाहिलें, कीं लोकांना जीविताचा इतका विलक्षण तिटकारा कां येतो याचा नीट विचार केलाच पाहिजे असें वाटूं लागतें. मनुष्य मृत्युवश व्हावा यांत कांहीं मोठेसें नाहीं. जन्मलेला प्राणी केव्हांतरी मरायचाच. जन्म व मृत्यु, दोन्हीं नैसर्गिक घटना होत, व खरें पाहतां आपण त्यांचें सोयरसुतक मानूं नये हेंच बरें. पण माणसाला मृत्यू येणें निराळें आणि माणसानें मृत्यूला कवटाळणें निराळें ! पहिली गोष्ट क्रमप्राप्त व सामान्य होय. दुसरी असामान्य म्हटली पाहिजे, व तिची कारणमीमांसा केलीच पाहिजे !

तुझ्या पत्राकडे विशेष लक्ष वेधतें याचें कारण जीविताच्या व ज्ञानाच्या फलश्रुतीचा तूं मोठ्या व्यापक दृष्टीनें विचार केला असावास असें तुझ्या लिहिण्यावरून दिसतें, व तुझी विचारसरणी मोठी बिनतोड वाटते. पण माझ्या चार गोष्टी तूं ऐकाव्यास अशी विनंति आहे. टेम्स नदींत जीव द्यायला निघालेल्या एका माणसाची एक पोलीस समजूत घालूं लागला, पण संभाषणांत पोलिसालाच त्या माणसाचें म्हणणें पटून शेवटीं दोघांनीं मिळून नदींत उडी घेतली, अशी एक गोष्ट सांगतात ती मला माहित आहे. मानवी जीविताच्या स्वारस्याविषयीं तुझ्याशीं चर्चा करतां करतां जगण्या-पेक्षां मरणें फार चांगलें असें म्हणण्याची पाळी माझ्यावरच कदाचित् येईल. आली तर आली.

पहिली गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही, कीं जीविताचें मोल ठरवायचें तर तें सापेक्षच ठरवितां येईल. वस्तुमात्राचें कांहीं तरी निरक्षेप मोल असलें पाहिजे अशी माझी आपली एक भावना आहे, पण कमकुवत मानवी बुद्धीला त्याचा ठाव लागणार नाहीं

असेंही वाटतें. ‘ विश्व, ’ ‘ जीवित, ’ ‘ अनंत, ’ ‘ उत्पत्ति, ’ ‘ लय ’ इत्यादि शब्दांची आपण कसरत करतों खरी, पण मनांतल्या मनांत आपण समजून असतों—निदान समजून असलें पाहिजे, कीं आपल्याला जें कळत नाहीं व कधीं कळेलसें वाटत नाहीं त्याचा उल्लेख करावयासाठीं हे शब्द आपण बनविले आहेत झालें !

सारांश, आपलें ज्ञान सर्वस्वीं खरें न मानतां त्याच्या मर्यादा ओळखूनच त्याचा अंगिकार करावा. अर्थात् आपल्या मनांत उद्भवणारा **निराशावाद म्हणजे तरी आपल्या ज्ञानाचाच एक प्रकार असल्यामुळें त्याच्याबरोबरही एकदम वहात जाण्यांत अर्थ नाहीं.** ज्योतिर्विदांनीं या आपल्या पृथ्वीची मातबरी शून्यवत् आहे असें म्हटलें म्हणून तेवढ्यानें गडबडून जायचें काय कारण आहे ? त्यांच्या तरी हातीं काय मोठा अबाधित सम्यग्ज्ञानाचा गड्डा लागला आहे ? या भूगोलाच्या उत्पात्तिलयाबद्दल त्यांना कोठें अजून निश्चित सिद्धांत बसवितां आला आहे ? इतराप्रमाणेंच तेहि बेटे तर्क लढवून पहाताहेत, हेंच खरें नव्हे काय ? भूगर्भवेत्ते, वनस्पतिशास्त्रवेत्ते, प्राणिशास्त्रवेत्ते—सगळे याच कोटींतले ! तेव्हां त्यांच्या सिद्धांतांनीं आपण डोक्यांत राख घालावी, आणि निरर्थक जगाचा व जीविताचा कायमचा निरोप घेण्यास उद्युक्त व्हावें, हा कांहीं सूज्ञपणा नव्हे. **शास्त्राच्या सिद्धांताविषयीं जरा साशंक राहायला आपण शिकलें पाहिजे.**

शास्त्रज्ञांना सर्वज्ञतेचा आव आणून बोलायची कधीं कधीं लहर येते. अशा वेळीं त्यांच्याकडे आपण लक्ष देऊं नये. त्यांच्या असल्या तोंडच्या वाफेपेक्षां वाफेचीं यंत्रें, विद्युत्यंत्रें, विमानें, यांसारख्या ज्या गोष्टी त्यांनीं करून दाखविल्या आहेत त्यांवर आपण अधिक निष्ठा ठेवावी. रात्रींच्या वेळीं विमानांत बसून

न्यूयॉर्क शहरावर एक चक्कर मारावी, आणि माणूस किती धाडस व सामर्थ्य दाखवूं शकतो त्याचा अनुभव घ्यावा; वेगांत व साहसांत काय उन्माद आहे तो मनसोक्त चाखावा. **शास्त्रांनीं जे पराक्रम करून दाखविले आहेत त्यांत हर्ष मानावा; पण अंतिम सत्य सांपडल्याचें सोंग करून शास्त्रें बोलूं लागलीं तर मनांतल्या मनांत हंसावें !** आपल्या कल्पकतेच्या साहाय्यानें हा माकडाचा वंशज काय काय करून दाखवील त्याला सीमा नाहीं. एक दिवस असा उजाडेल कीं खगोलांतील तारकांमधून राजरस्ते बांधून माणूस विहार करूं लागेल, आणि काळ्यापाण्याच्या कैद्यांची अंदमानच्याऐवजीं अंतरिक्षांतल्याच एखाद्या ग्रहावर तो रवानगी करूं लागेल ! **माणसाला मरायची हौस असेल तर संशोधनांत भर टाकण्यासाठीं एखादें विलक्षण साहस करतां करतां तरी त्यानें मरावें. अशा मृत्यूनें जन्म सार्थकीं लागेल. ज्ञानानें व वेदांतानें घाबरून जाऊन प्राण सोडण्यांत कांहींच अर्थ नाहीं !**

मानवी संस्कृतीची प्रगती म्हणजे निवळ भ्रमच आहे काय? या प्रश्नाचें उत्तर ‘ प्रगती ’ या शब्दाचा कोणता अर्थ घ्याल त्यावर अवलंबून राहील. अखंड, निर्भेळ, निरपवाद प्रगति म्हणाल तर झालेली नाहीं. किंबहुना, कधीं व्हायची नाहीं. समुद्रकिनाऱ्याच्या एका जागीं भरतीची लाट आपटून फुटत असते त्याच वेळीं दुसऱ्या जागीं ती यायची असते, किंवा येऊन परतलेली असते; आणि शिवाय भरतीची लाट दहादां परतते, दहादां पुढें जाते, तेव्हां अर्धा मुक्काम गांठते. मानवी संस्कृतीच्या प्रगतीचें असच आहे. इतकेंच नव्हे तर भरतीची लाट परमावधीला पोचली कीं फुटायची हें जसें ठरलेलें तसेंच मानवी संस्कृतीची एक विविक्षित दशा परमोत्कर्षाला पोचली कीं नष्ट होऊन तिनें उभा केलेला पसारा लुप्त

व्हायचा हेंही ठरलेलेंच आहे. पण संस्कृतीच्या एकेका अवस्थेंतल्या मानवी पराक्रमांचा असा लोप झाला म्हणून संस्कृति म्हणजे निवळ भ्रम होय असें म्हणणें सूर्य पुनःपुनः मावळतो तेव्हां सूर्यच खोटा म्हणण्यासारखें वेडेपणाचें होईल ! आज आपली स्थिति अनेक दृष्टीनें अनुकंपनीय दिसत असेल. **पण सरासरीनें पाहिलें तर प्राचीन माणसाहून आजचा माणूस अधिक संपन्न, अधिक बलिष्ठ व अधिक बुद्धिमान आहे असें दाखविणारा वाटेल तेवढा पुरावा देतां येईल.** आपण निराशेनें घाबरतों याचें कारण असें कीं, आपल्या परिचयाच्या सामान्य माणसांची एकदम प्राचीन काळां-तल्या विभूतींशीं आपण तुलना करून पाहतों. प्लेटो किंवा ॲरि-स्टॉटल अशा थोर व्यक्ती पूर्वीं होऊन गेल्या खऱ्या. पण प्लेटो-सारखा एक शहाणा ज्या आथेन्सच्या राज्यांत होता तेथें हजारों मूर्ख व दुष्ट लोक होतेच कीं! लांचलुचपती होत्या, जोरजुलूम होते, स्त्रियांची विपन्नावस्था होती आणि अनाचारही होते! हें लक्षांत घेऊन सूक्ष्म विचार केला तर मनुष्य खरोखर कालाबरोबर अधिकाधिक सुधारतोच आहे असें म्हणावेसें वाटेल.

माणूस नीतिभ्रष्ट झाला आहे--किंवा होत चालला आहे--असें ओरडण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण, **आजच्या काळांतल्या माणसाची वागणूक प्राचीन नीतिकल्पनांच्या तराजूंत जोखणें चुकीचें होय.** माणसाचें जीवित कृषिकर्मप्रधान होतें तेव्हांच्या त्या कल्पना आहेत. आजच्या यांत्रिक युगांत व नागर राहाणीच्या काळांत त्यांची किंमत अबाधित मानतां यायची नाहीं. जे स्त्रीपुरुष तिसाव्या वर्षापर्यंत अविवाहित राहतात, जे नागर राहणीच्या सुख-सोईंत व विलासांत नित्य वावरतात, व ज्यांना परस्पर सहवासाचे व एकांताचेही अनेक प्रसंग सहजासहजीं मिळतात--ते स्त्रीपुरुष

प्राचीन शेतकऱ्यांनीं मान्य केलेले विधिनिषेध पाळतील, अशी अपेक्षा करणें हास्यास्पद होय. नवी विटी, नवें राज्य, तद्वत् नव्या काळांत नवी नीति रूढ व्हावी हेंच उचित. आजूबाजूस वावरणाऱ्या स्त्री-पुरुषांचीं वागणूक अधिकाधिक चिकित्सेनें जों जों मी पाहतों, तों तों मला तर अधिकाधिक वाटतें, कीं **आजचे स्त्रीपुरुष प्राचीन स्त्रीपुरुषांहून पुष्कळ निर्मळ व शीलसंपन्न आहेत.** वाङ्मयांतल्या व चित्रपटांतल्या अश्लीलतेवरून वाटतें तसे ते बहकलेले नाहींत. त्या अश्लीलतेची मीमांसा निराळीच आहे. आमचे पूर्वज पांचपंचवीस बायकांचे जनानखाने ठेवीत, आणि द्वंद्वयुद्धांत एकमेकांचे मुडदे पाडीत. त्या प्रकारांतली करमणूक अन्य स्वरूपांत असावीशी वाटते म्हणून आमच्या कथावाङ्मयांत व चित्रपटांत जारकर्मांना व गुन्हे-गारीला ऊत येतो इतकेंच !

हें सर्व सांगण्यांतला इत्यर्थ असा कीं, प्रिय मित्रा, ज्या गोष्टींनीं घाबरून जाऊन व वैतागून तूं आत्महत्या करायचें ठरवूं पाहतोस त्या तशा नाहींत. मानवी जीविताचा अमूक एक अर्थ व हेतु आहे असें निरक्षेप दृष्टीनें व निश्चयानें सांगतां येईल काय ?— नाहीं. व्यक्ति अमर आहे काय ?-- नाहीं. कोणत्याही देशाची संस्कृति अखंड टिकते काय ?—नाहीं ! **हे सर्व सिद्धांत मला मान्य आहेत. पण ते इतके उघड व साधे आहेत, कीं ते आतां माझ्या अंगवळणीं पडले आहेत, व त्यांचें मला भय वाटेनासें झालें आहे !** कारण या सिद्धांतानीं मानवी जीविताच्या मर्यादा स्पष्ट होतात येवढेंच ! त्या मर्यादांनीं युक्त अशा माझ्या वैयक्तिक जीवि-तांत व मानवजातीच्या समष्टिमय जीवनांत हेतूलाच नव्हे तर आनं-दाला व समाधानालासुद्धां वाटेल तेवढा अवकाश राहतोच ! अमरत्व देणाऱ्या अमृतकुंभाच्या किंवा सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या कल्पतरूच्या

कल्पना भ्रामक ठरल्या म्हणून वांकडें तोंड करणारीं माणसें नव्या काळांतल्या धकाधकींत सामील होतील, व कसून उद्योग करतील तर त्यांचा रुसवा आणि निराशावाद खचित नष्ट होईल. विफल ठरलेल्या सुखस्वप्नांच्या नांवानें रडायला आजच्या धांवपळींत माणसाला वेळ नाहीं. ईश्वराच्या व अमरत्वाच्या कहाण्या खोट्या ठरल्या तरी आजचे तरुण स्त्रीपुरुष दु:खाचे उसासे सोडणार नाहींत !

**जीविताच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कशाचा तरी कस लावून जीविताचा अर्थ शोधूंच नये. जगण्यांतच जगण्याचा खरा अर्थ आहे.** जिवंतपणींच्या नानाविध प्रेरणांत व त्यांच्या पूर्ततेंतच खरें समाधान, व खरें स्वारस्य आहे. आपल्या शरिरांत जो तब्येतीचा जोम मुसमुसत असतो त्याचा अर्थ कसला विचारायचा ? त्या जोमामुळें कांहींतरी महत्वाचें कार्य घडावयाचें असतें हें तर झालेंच. पण तसें नसतें तरी देखील त्याची स्वयंसिद्ध महति आणि आनंद आहेच ! असाध्य रोगानें जर्जर झालेला एखादा माणूस आत्महत्या करावयास निघाला तर अंतकाळास योग्य असे चार मंत्र म्हणून मी त्याला खुशाल निरोप देईन. किडक्याकुजक्या जीवाची मरणाची वाट अडविण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. पण ज्याचें आरोग्य उत्तम असेल, ज्याचे पाय मैल दोन मैलांची चाल करूं शकत असतील, व ज्याची क्षुधा प्रज्वलित असेल, अशा माणसानें आत्महत्येचा विचार करावा !—छे, छे, छे ! त्यानें कण्हतां कुथतां कामा नये. प्रात:काळीं सारी सृष्टि सूर्यप्रकाशानें न्हाऊं लागलेली दिसतांच त्यानें उल्हासानें आरोळी ठोकावी, आणि उद्योगाला लागावें !

जिवंतपणाच्या प्रत्ययांत, आरोग्याच्या मस्तींत , पंचेंद्रियांच्या स्नायूंच्या अखंड हालचालींत जो विलक्षण आनंद आहे, तोच

या जीविताचा साधा सरळ अर्थ होय ! मोठ्या माणसापेक्षां लहान मूल अधिक आनंदांत असतें; याचें कारण आत्म्यापेक्षां शरीराचचि जाणीव त्याला अधिक असते. आधीं जगलें पाहिजे, मग वेदान्त हें त्याला अंत:प्रेरणेनें समजतें ! आपल्या हातापायाचा अंतिम अर्थ काय असले प्रश्न तें उकरून काढीत नाहीं. आपण मोठ्या माणसांनीं आपल्या हातापायांनीं कष्ट केले तर आपणसुध्दां लहान मुलाप्रमाणें सदा आनंदांत राहूं. गॉल्फच्या खेळांत मनसोक्त टोलेबाजी करायला मिळते, आणि चेंडू शोधायच्या निमित्तानें मैलोगणती पायपिटी करायला मिळते येवढ्यासाठींसुद्धां तो खेळ शोधून काढणाऱ्याला मी धन्यवाद देईन !

**आनंदाच्या व उल्हासाच्या उन्मादाचे जे थोडे क्षण प्रत्येकाच्या वांट्याला आयुष्यांत केव्हां ना केव्हां तरी येतात त्यांपलीकडे या जीवितांत कांहीं स्वारस्य नसलें तरी मला कांहीं वाटणार नाहीं.** तेवढ्या त्या थोड्या क्षणांसाठीं जगावेंसें प्रत्येकाला वाटलें पाहिजे. पावसापाण्यांतून वाट काढावी, वादळाला तोंड द्यावें, बर्फांतून भटकावें, किंवा एखाद्या गिरिशिखरावर बसून प्रकाशाभरण नाहींसें होत होत यामिनीचें शरीर अखेर दिसूं लाग-लेलें पहावें ! जीवितावर प्यार करावयास लावण्यास येवढ्या गोष्टी रगड होण्यासारख्या नाहींत काय ? अखेर आपणा सर्वांना मरायचें आहे, येवढेच ना ? मरूं कीं ! तोंपर्यंत सूर्योदयाची दिव्य शोभा आणि नभोमंडळांतील तारकापुंजाचें वैभव तर आपल्याला मन:पूत लुटायला मिळेल ना ? झालें तर !

निसर्ग अखेर माझा नाश करणार आहे. करीना ! तसें कर-ण्याचा निसर्गाला अधिकारच आहे. त्यानेंच मला निर्माण केलें ना ? माझ्या पंचेंद्रियांत चैतन्य घालून शतावधि सुखसंवेदनांचा अनुभव

दिला ना? जें त्यानें मला मुक्तहस्तांनीं दिलें तें त्यानें पुन्हां परत घेतलें तर मी तक्रार कां म्हणून करावी? उलट, निसर्गाचे आभार किती व कसे मानूं असें मला झालें पाहिजे. कारण, पंचेंद्रियांच्या द्वारें किती तरी सुख मी लुटींत आहे! हे हात, ही रसना, दृष्टि, श्रुति—सृष्टींतलीं सारी शोभा व हर्षसंपत्ति आपलीशी करून घेण्यासाठीं कितीं साधनें निसर्गानें माझ्या स्वाधीन केलीं आहेत!

आणि प्रिय मित्रा, प्रणयाबद्दल तूं असा उद्वेगानें कां बरें बोलतोस? प्रणयाच्या मुळाशीं हिणकस देहधर्म आहेत हें जसें खरें, तसेंच, प्रणयांतूनच अनेक रमणीय मनोभावांचा उगम होतो हेंही विसरतां कामा नये. वृक्षाचें मूळ गलिच्छ जमिनींत रुजलेलें असतें, पण त्याच्या शेंड्यावर सुगंधी, नाजूक फुलें बहरलेलीं असतात. प्रणयाचें असेंच आहे. कामप्रेरणेच्या बुडाशीं केवळ देहवासनेची घाई असेल, पण त्या प्रेरणेचा अत्यंत उच्च परिपाक निस्सीम भक्तींत आणि सौजन्यांत होतो. काव्यनाटकांतल्या प्रणयाबद्दल मी बोलत नाहीं. माणसाला ज्या व्यक्तीचें प्रेम हवें असतें त्या व्यक्तीकडून त्याची मनकामना पुरी झाली नाहीं, म्हणजे इच्छापूर्तीचीं काल्पनिक चित्रें तो रंगवूं लागतो व काव्य प्रसवतो. आजकाल पूर्वींइतका कामनाभंगाचा संभव उरला नाहीं, तेव्हां अर्थात् काव्यनाटकांना व नाटकी प्रणयाला पूर्वींसारखा ऊत न आला तर तें साहजिकच होय. प्रणयाविषयीं बोलतांना असला नाटकी प्रणय माझ्या दृष्टीसमोर नाहीं. ज्यांनीं जोडीनें कष्ट सोसले आहेत, हातांत हात घालून दुःखाच्या वेळीं एकमेकास आधार दिला आहे, थोड्याफार सुखांत एकमेकास समभागी केलें आहे,—किंबहुना द्वैताची जळून शुद्धि होऊन ज्यांच्यांत अद्वैत जीवनाची ज्योत पेटली आहे अशा स्त्रीपुरुषांच्या दोस्तीला मी प्रणय म्हणतों. असे प्रेमिक नित्य-

नेमानें भांडत असतात, व 'नको तुझी संगत' असें एकमेकाला हजारदां म्हणत असतात, हें मला माहित आहे; पण उलट दोघां-पैकीं प्रत्येकाची मनोमय खात्री असते, कीं दुसऱ्याचें सारें चित्त आपल्याकडे आहे, दुसऱ्याला आपला आधार वाटतो, आपला येवढासा गुण दिसला तरी त्याकडून त्याचें कौतुक होणार, आणि घरीं जातांच उत्कंठेनें रम्य दिसणारें त्याचें हास्यवदन आपल्याला दिसणार! या भावनेच्या आनंदापुढें भांडणाची कसली भीति? मी तर म्हणेन, जगांत महायुद्धें माजलीं तरी चालतील, पण प्रेमाची सोबत नाहींशी होऊन स्त्रीपुरुषांच्या वांट्याला एकलकोंडेपणा आला तर मानवी जात नष्ट व्हायला कांहीं फारसा अवधि नको!

कोणी वैतागून निराशावाद प्रतिपादायला लागला कीं, मी मनाशीं म्हणतों, 'स्वारीचं लग्न झालेलं नसावं!' कारण, विवाहित माणसाला रडगाणें गायला सवडच नसते. बहुतेक निराशा-वाद्यांच्या वैतागाचें कारण येवढेंच असतें, कीं आयुष्यांतल्या खस्ता खातां खातां व अपेष्टा भोगतां भोगतां ते चिडून जातात, व स्वतःच्या दौर्बल्यावरून सिद्धांत काढतात, कीं या मानवी जीवितांतच कांहीं अर्थ नाहीं! स्वतःपलीकडे दुसऱ्या व्यक्तींची जाणीवच त्यांना नसते, त्यांचे सारे विचार अहंभावांत घोंटाळत असतात, आणि त्यामुळें त्यांना वाटतें, स्वतःच्या मनांत उद्‌भवलेला वैताग म्हणजेच खरा वेदांत! ज्यांना चारचौघांशीं सहकार्य करावें लागतें, व चार-चौघांच्या सुखदुःखांशीं समरस व्हावें लागतें अशीं माणसें सहसा वैतागत नाहींत. एकांडेपणानें जगापासून विलग राहून निराशेंत पिचणाऱ्या तत्त्वज्ञान्यांपेक्षां दहा सवंगड्यांच्या खांद्याला खांदा लावून एखाद्या खेळाचा सामना खेळणारा साधाभोळा खेळाडू कितीतरी पटींनीं अधिक सुखी असतो. **आपणांव्यतिरिक्त एका अगर**

अनेक व्यक्तींच्या जीवनाशीं आपल्या जीवनाचें ऐक्य केलें, कीं जीविताला कितीतरी अर्थ व केवढा तरी भरघोसपणा येतो. त्या इतर व्यक्तींच्या दुःखाचा भार हलका करतां आला, अगर सुखांत भर घालतां आली, अगर त्यांस कसलेंही साहाय्य करतां आलें, कीं तेवढ्यापुरतें आपल्या स्वतःच्या जीविताची सार्थकता झाल्यासारखें वाटल्यावांचून रहात नाहीं. ज्यांना चारचौघांत मिसळणें कमीपणाचें वाटतें, आपल्या योग्यतेची बायको मिळायची नाहीं अशा कल्पनेनें जे लोक लग्नावांचून व बायकांमुलांवांचून रहातात, त्यांना आयुष्य रिकामें आणि फुकाचें वाटूं लागतें, व ते भांबावून जाऊन विचारूं लागतात, या जीविताला कांहीं अर्थ आहे काय? पण चार मुलांबाळांच्या पोशिंद्याला विचारा, जीविताचा अर्थ काय म्हणून; तो फारसा विचारांत न पडतां म्हणेल, 'कुटुंबाचें पालनपोषण करणं हाच!' स्त्रीपुरुषांमधील परस्पर आकर्षणाचा वरवर विचार केला तर वाटतें, कीं कामविकार म्हणजे निवळ वेड आणि वृथा धांवपळ आहे झालें! पण खरें पाहतां जीवितप्रवाह चालू ठेवण्यासाठीं कामविकाराचा उपयोग केला तर त्यामुळेंच व्यक्तीच्या आयुष्याला शोभा व सार्थकता येते!

हें लिहितांना मी आगगाडींत बसून प्रवास करीत आहे. माझ्यासमोर एक स्त्री बसली आहे. ती आपल्या तान्ह्या मुलाशीं खेळत आहे, व त्याच्याशीं बोबड्या शब्दांत बोलतां बोलतां, चुटक्या वाजवितां वाजवितां, आणि माना वेळावून हंसतां हंसतां भोंवतालच्या जगाचें तिला भान उरलेलें नाहीं. जीविताचा अर्थ उकलूं पाहणाऱ्या पंडितांनो, या स्त्रीहून तुमच्या अंगीं अधिक शहाणपण आहे असें तुम्हांला वाटतें काय? आणि ज्ञानाच्या प्रगतीनें भांबावून हातपाय गाळणाऱ्या शास्त्रज्ञांनो, ही स्त्री तुमच्याहून अधिक श्रेष्ठ

नव्हे काय? **दुसऱ्या एका जीवाशीं ती तादात्म्य पावली आहे, ती स्वतःच्या जीविताचा संकुचितपणा पार विसरून गेली आहे,—आणि ती पूर्ण सुखांत आहे!**

म्हणजे जीविताच्या सार्थकतेचा एकच मार्ग आहे म्हणायचा; **आपल्या वैयक्तिक जीविताहून अधिक व्यापक अशा जीवितांत सामील व्हावें, आणि त्यासाठीं रात्रंदिवस कायावाचामनेंकरून कष्ट करावे!** आपल्याहून अधिक व्यापक असें कांहींतरी निर्माण करण्याचा अगर त्यांत अंशभागी होण्याचा योग या जीवितांत मिळतो म्हणूनच हें जीवित धन्य समजलें पाहिजे. सुखाचा व समाधानाचा मूलमंत्र हाच कीं **वैयक्तिकाहून अधिक व्यापक अशा कोणत्या तरी जीवितप्रकाराशीं आत्मीयता जोडावी, आणि आपल्या सर्व शक्तींस पुरून उरेल असा उद्योग अंगावर घ्यावा!**

जे प्रश्न मी इतरांना विचारले त्यांचीं उत्तरें मी कशी देईन तें या सामान्य विवेचनावरून उघड होण्यासारखें आहे. माझ्या जीविताचा हेतु व अर्थ कशांत आहे? माझ्या कुटुंबांत व उद्योगांत! माझ्या उद्योगांत मी कशामुळें रमतों? मला स्वार्थ साधायचा असतो म्हणून! परार्थबुद्धीहि माझ्या ठिकाणीं आहे, पण तिच्यांत-सुध्दां स्वार्थाचा अंश आहेच. कीर्तीची अमर्याद हौस, आणि कुटुंबांतल्या माणसांस सुखांत ठेवण्याची अनिवार तळमळ, या दोहोंत माझ्या सर्व उद्योगाचा उगम आहे. उद्योगानें मला काय साध्य करायचें असतें? जिकडे तिकडे आनंद व उल्हास दिसावा, आणि मजपेक्षां जे श्रेष्ठ आहेत त्यांनीं माझी पाठ थोपटावी येवढेंच. मला प्रसन्न करणाऱ्या गोष्टी कोणकोणत्या? माझी बायकामुलें, माझे ग्रंथ आणि दौतटांक! **माझ्या सुखाचा ठेवा कोठें आहे? सगळी-कडे. माणसानें हरएक गोष्टींतलें मर्म व आनंद समजण्याची**

**पात्रता स्वतःच्या अंगीं ठेवावी, म्हणजे त्याच्या सुखाला सीमा नाहीं. निसर्ग म्हणजे तर आनंदाचा अथांग निधीच होय.** माझ्या इतर सर्व सुखांचा अपहार झाला तरी निसर्गांतील अनंत दृश्यांतील व ध्वनींतील आनंद अनुभवण्यासाठीं जिवंत रहावेंसें मला वाटेल.

माझ्या ठिकाणीं धर्मश्रद्धा आहे काय ? व असल्यास तिचा मला काय उपयोग होतो ?

हा प्रश्न सर्वांत कठिण आहे.

आगगाडींत बसून हा लेख मी लिहीत आहे. वरील प्रश्न लिहिल्यावर सहज खिडकींतून डोकावून पाहिलें तों खालीं दरींतल्या एका लहानशा गांवांतले स्त्रीपुरुष प्रार्थनेसाठीं चर्चमध्यें शिरत होते. त्या श्वेतवर्ण कळसाखालीं किती वेडगळ, पोरकट ब्रह्मविद्येचें प्रवचन होत असतें, कसल्या आततायी व पंथनिष्ठ मतांची जोपासना केली जात आहे, व हे साधेभोळे शेतकरी आपल्या खुळ्या धर्मश्रद्धेच्या संरक्षणार्थ किती भेसूर स्वरूप धारण करून भयंकर अत्याचार करतील—या सगळ्यांची मला कल्पना आहे. तथापि त्यांच्याविषयींच्या सहानुभूतीनें माझा ऊर भरून येतो. ते भोळेभाबडे, सश्रद्ध जीव मला आवडतात. त्यांची ती श्रद्धा एका घावानें नष्ट करतांना माझा हात जरासा चळेलच.

माझें म्हणणें आणखी फोडून सांगतों. प्राणिशास्त्राच्या परि-शीलनामुळें **व्यक्तिगत आत्म्याच्या अमरतेवरील माझा विश्वास नाहींसा झाला आहे. त्याचप्रमाणें ईश्वराच्या रूढ कल्पनाही मला त्याज्य वाटतात.** जगांतल्या साऱ्या लहानमोठ्या घडामोडींचीं सूत्रें आपल्या हातीं ठेवून प्राणिमात्रांना सुखदुःखांचीं ' डिव्हिडंड्स '

वांटणारा ईश्वर हास्यास्पदच होय. असल्या वेडगळ कल्पनेंत कोणती तर्कशुद्धता आहे तें पटविणारा माणूस मला भेटेल तर मी त्याचा आभारी होईन. पुनर्जन्माच्या कल्पनेंत मला स्वार्थबुद्धीखेरीज दुसरें कांहीं दिसत नाहीं. आणि जेथें अनंत जीवाची दाटी वाढत चालली आहे असल्या स्वर्गाला अखेर कलकत्याच्या 'ब्लॅक होल'चीच अवकळा येणार असें मला वाटतें. मात्र या जगताचा अखेरचा निरोप घेतांना मला दुःख होईल; आणि माझ्या पश्चात् माझ्या बायकामुलांचा, मित्रांचा, व जीं कार्यें मीं अंगीकृत केलीं होतीं त्यांचा योगक्षेम कसा चालेल तें मला कळेल तर मनाला मोठें समाधान वाटेल.

याचा अर्थ असा, कीं **जुन्या धार्मिक श्रद्धा व समजुती मीं टाकल्या आहेत व माझ्या मनःशांतीला त्यांची आवश्यकता मला वाटत नाहीं** हें जरी खरें, तरी एखाद्या खोलींतलीं फुलें उचलून दुसरीकडे नेलीं असलीं कीं त्यांचा सुगंध तेथें घोटाळावा तद्वत् त्या समजुतींच्या स्मृतींचा परिमल मात्र माझ्या अनुभवास अजून येतो.

अरे! आत्महत्येस उद्युक्त झालेल्या माझ्या मित्रा, माझ्या विचाराच्या तंद्रींत तुला मी विसरलोंच कीं! माफ कर हं! पण मी जें लिहिलें त्यावरून तुझ्या लक्षांत आलें असेल, कीं तुझ्या वैता-गाच्या रोगावर खरें औषध म्हणजे वेदान्त नव्हे; तर बायकामुलें आणि भरपूर उद्योग हेंच होय! एका फ्रेंच पंडिताचे असे उद्‌गार आहेत कीं, "मी असा उद्योगाखालीं दडपून गेलों नसतों तर मी एखादे वेळीं आत्महत्त्या केली असती!" खरेंच, पुन्हा सांगतों, ज्यांना कामधंदा भरपूर नसतो तींच माणसें निराशावाद घालीत बसतात. तेव्हां मित्रा, आटप, कोठें तरी काम पत्कर. कारखान्यांत मजुरी केलीस तरी हरकत नाहीं. ती मिळाली नाहीं, तर एखाद्या

शेतकऱ्याकडे जा, आणि केवळ दोन वेळच्या जेवणाचा पगार समजून त्याची जमीन नांगरायचें कबूल कर. मग पहा तुझा आत्महत्येचा बेत बदलतो कीं नाहीं तें !

पण असला हा उपदेश अधिक लांबविण्यापेक्षां येवढेंच अखेर सांगतों, कीं तुझी भेट झाली आणि घटकाभर आपल्याला बोलतां बसतां आलें तर छान होईल. मग माझ्या राहत्या घराला लागून एक सुंदर राई आहे ती मी तुला दाखवीन, व माझ्या साऱ्या पुस्तकांनीं होणार नाहीं इतक्या सहजपणें त्या राईचें अनुपम दृश्य तुझी खात्री पटवील कीं, जीविताचा अंत करणें वेडेपणाचें होय. मित्रा, खरेंच ये. मी एक भोळा, भाबडा आशावादी आहे झालें असें मला सांगितलेंस तरी चालेल. तुझ्याजवळचा सगळा पुरावा माझ्यापुढें मांड, व या जगाचा हवा तेवढा धिःकार कर. मी तुझ्या म्हणण्याला 'हुं'च म्हणेन. मात्र तुझ्या अखेरच्या निष्कर्षाला नाहीं ! आपला वाद आटपल्यावर माझ्या गरिबाच्या घरची आमटीभाकर आपण मजेनें एकत्र बसून खाऊं, आणि, त्या वेळीं भोंवताली खेळणाऱ्या माझ्या बाबालेकांचीं बोबडीं बोलणीं ऐकलीं कीं तुलामला वाटेल, अरे, आपण अजून तरुण आहोंत कीं ! या जीविताची मौज आणखी कित्येक वर्षें आपल्याला लुटायची आहे !



समाप्त.